# निवेदन

सागरिकेचे हे तरङ्ग म्हणजे केवळ माझ्या इच्छे-वरून तिने मला वेळोवेळी साङ्गितलेल्या गुजगोष्टी आहेत या. लघुनिबन्ध म्हणून हेतुतः यांची निर्मिती झाली नाही. त्यामुळे या तरङ्गात कदाचित् लघुनिबन्धाचा रेखीवपणाहि आढळणार नाही. तरी पण या तरङ्गाच्या कणाकणातून सागरिकेचे आत्मभाव थबथबलेले आढळून येतील.

वस्तुतः हे लिखाण प्रसिद्ध होऊ नये अशीच साग-रिकेची मनीषा. कारण हे लिखाण प्रसिद्धीसाठी लिहिलेच नव्हते मुळी. माझ्या आग्रहामुळेच हे तरङ्ग प्रकाशित करण्यास तिची सम्मति मिळाली.

तरङ्गाच्या सुन्दरपणाबद्दल मी स्वतः निर्वाळा न देता रसिकानाच इकडे अवधान देण्याची विनंति करतो.

शशाङ्क

# शशाङ्क साहित्य

## मुद्रित

१ मालती
२ भारतीय चित्रकला
३ शशिकला
४ त्याग
५ मरीचिका
६ कलातरङ्ग
७ वर्तिका
८ झङ्काराचे पडसाद

## अमुद्रित

९ दीपिका
१० ज्योति आणि फुले
११ इलत्या सावल्या
१२ भारतीय नृत्यकला

# तरङ्ग

अनुक्रम | पृष्ठ

कै. गु. डॉ. माधवराव पटवर्धन
यांच्या प्रेमळ स्मृतीस
अर्पण

तरङ्ग

सागरिका

# १ : : : : : : मनोरे

खिडकीत मी उभी होते. मन्द मन्द वारा सुटला होता. भविष्यकालच्या सुखद विचारानी मन आन्दोलन पावत होत माझं! इतक्यात मन्द पण मधुर स्वरात कुणी भावगीत म्हणायला सुरुवात केली.

हिण्डोनिया रानोमाळ, वृक्ष शोधीले फुलांचे
हार गुम्फाया कुणाचे ?
कुणासाठी दारातून, वाकवाकोनी पाहसी
कोण येणे मन्दिरासी ?

गालावरी फुललेली, रम्य गुलाबाची बाग
कोणी फुलविली साङ्ग ?
नको गडे, बान्धू ऐसे, स्तम्भ आशांचे सुन्दर
दैव घालील फुङ्कर
पवनाच्या सोसाट्यात, मन गेले हादरून
गेले मनोरे विरून !

जीवनाचं किती करुणरम्य चित्र हे! आशांचे मनोरे मनुष्य बान्धतो खरे, पण त्याच्या वाट्याला काय येतं शेवटी? भग्न मनोरे!! श्रीमन्तीच्या साधनानी सिद्धीला जात असतील कदाचित् हे मनोरे. पण गरिबाच्या...? दरिद्राणां मनोरथाः

मुली तरी काय मनोऱ्यासारख्याच नाहीत का? रक्ताचं पाणी करून त्याना वाढवायचं, शिक्षण द्यायचं, नि परक्याच्या पदरात टाकायचं! पण सुखाची सावली नाही मिळत त्यांच्याकडून मातापित्याना. विजयाचं स्मारक म्हणून पहावं त्यांच्याकडं फार झालं तर अभिमानानं! आशा नि मनोरे एकाच जातीतले नाहीत का? मनोरे बान्धायला किती त्रास पडतो! आशाचे मनोरे सुद्धा सत्यसृष्टीत अवतरायला कोण त्रास पडतो! कॉलेजात प्रथमच पदक्षेप करतेवेळी एखादा तरुण भावी आयुष्याचे किती भव्य मनोरे बान्धीत असेल! गृहप्रवेश करताना एखादी नववधूहि असेच मनोरे चढवीत असेल! श्रीमन्तगरीब, लहानमोठे स्त्रीपुरुष असेच

मनोरे बान्धतात. पण सगळ्यांचेच मनोरे सिद्धीला जातात का? मुळीच नाही. Man proposes and God disposes म्हणतात. मनुष्याच्या आशांचे मनोरे नाही सत्यसृष्टीत खरे ठरत! दैवाच्या टोकरीसरसे धुळीला मिळतात ते! कधी कधी दुरून अस्पष्ट दिसणारे हे मनोरे भारी आकर्षक नि सुन्दर दिसतात; पण जवळ जाताच–काय? सुखाचं तूपहि नाही नि समाधानाचं तेलहि नाही. काय अवस्था होत असेल मनाची त्या वेळी? कुणीसं म्हटलय् Things are not what they seem. मनोऱ्याचीसुद्धा तीच स्थिति नाही का? वरून गगनभेदी नि मोहक दिसणारे मनोरे, आतून किती अन्धार असतो त्यांच्या! किती कृमिकीटकांचं, विषारी प्राण्यांचं वसतिस्थान असतं! कोन्दट वातावरण! जीव गुदमरून जातो नुसता. जितके मनोरे उंच तितके ते संकुचित होत गेलेले. वर गेल्यावर तरी काय, डोळे फिरतात लागलीच! वरून खाली दृष्टी फेकणाराला आपल्याच जातीची माणसं, आपण राहतो तेच वातावरण–किती क्षुद्र वाटू लागतं? सम्पत्तीच्या, मानाच्या नि सुखाच्या मनोऱ्यावर चढल्यावर हीच स्थिति होत नाही का? सभोवतालची परिस्थिति दिसेनाशी होते. धुन्दकारल्या नयनानी पाहतो मनुष्य आणि गगनाला हात लागल्याचा भास होतो त्याला! पण...पण –नाही! तो भासच ठरतो हं! मनुष्य कितीहि जरी उंच

गेला—स्वर्ग दोन बोट उरला त्याला, तरी क्षितिज नेहमी दूरच राहतं ! जसं जसं वर जावं तसं तसं त्याचं वलयहि मोठं होतं जातं. निसर्गाचं तत्त्व अमर आहे ! दुबळ्या मानवानं कितीहि जरी आकाशाला गवसणी घालण्याचा प्रयत्न केला तरी शेवटी काय ? जसे मनोरे चढायचे तसे ते उतरले पाहिजेत. तिथं नाही त्याला कुणी राहू देत !

उंच उंच मनोरे बान्धले; कुणी ? जेत्यानी ! शहाजहाननं ताज बान्धला. त्याच्यावर प्रीतीचे मनोरे चढविले; त्याच्या विशुद्ध प्रेमाचा प्रवाह त्या मनोऱ्यातून ओसण्डत आहे. कुतुबमिनार कुतुबनं बान्धला, पण त्याची दृष्टी तो मिनार बान्धताना धुन्दावली असेल. त्या धुन्दीतूनच, विजयाच्या उन्मादातूनच, कुतुबमिनार निर्माण झाला. मुसलमानी अमलात किती मनोरे मशिदीवर चढले असतील, पण ते मनोरे कशाचे निदर्शक ? मुसलमानांच्या धर्मवेडाची प्रतिमाच नाही का ती ? हिन्दूंच्या धर्मभावना तुडवून, देवळांचे कळस उतरून हे मनोरे आसुरी भावनेनं नाही का चढविले गेले.

मानवी मन देखील असंच नाही का ? कित्येक आशांचे, महत्त्वाकाङ्क्षेचे मनोरे बान्धीत असतात. कुणाचे शुद्ध नि कोमल भावनांचे असतात. कुणाचे पाशवी मनोवृत्तीचे निदर्शक असतात. कुणाचे दुसऱ्याना पायदळी तुडवून त्यांच्या रक्तामांसाच्या पायावर आपल्या आकाङ्क्षा

पूर्ण करण्याचे असतात. पण इथून तिथून हे सगळे मनोरे सारखेच ना?

पिसा येथील मनोरा १४ फूट कलता आहे म्हणतात. विज्ञानशास्त्र म्हणतं, की त्याचा गुरुत्वमध्य ढळला नाही म्हणून तो मनोरा अजून जीव धरून आहे. मनुष्य बान्धतो ते मनोरेदेखील असेच नाहीत का? विवेकाच्या पायामधून त्याचा गुरुत्वमध्य ढळला की ते कोसळतात. काळ जसा खऱ्या मनोऱ्याचा भक्षक, तशी परिस्थिति मानवी मनाच्या मनोऱ्याची भक्षक आहे. दैवाच्या फुङ्करीनं त्याच्या ठिकऱ्या उडायला काय वेळ! म्हणून मनोरे वाऱ्यावर न बान्धता विवेकाच्या बळकट पायावरच ते आधारले पाहिजेत. नाही का?

  

## २ : : : : : : स्वप्न

जूनची सहा तारीख! मॅट्रिकचा निकाल होता त्या दिवशी! खिन्न मनःस्थितीत मी बसले होते. शेजारच्या रेडिओवर गर्दी होती. इतर मुलांचे खिन्न–उत्सुक चेहरे दिसू लागले. रस्त्यावरून मुलांचे थवेच्या थवे चालले. माझं लक्ष दाराकडं गेलं! ताम्बड्या सायकलवरून खाकी पोषाक केलेला पोस्टमन खाली उतरला. धावतच खाली गेले मी! तार घेतली आणि अत्यानन्द...अं!

"आई, आई, आई! शर्थ झाली. कित्ती हाका मारा-

यच्या ? कित्ती वेळची मी इथं उभी आहे ? हातात पुस्तक घेऊन कसला विचार करतेस ? म्हटलं अभ्यास करतेस का जागेपणी स्वप्नं पहातेस ?" माझी मैत्रीण बोलली.

जागेपणचं स्वप्न ! खरंच, भविष्यकाळचं अज्ञात गोड स्वप्न पहात होते मी ! कशाला मला जाग आणली तिनं ? किती गोड गुङ्गीत होते मी ? कुणास ठाऊक मी पास होणार होते की नाही ते ! पण ते जागेपणचं स्वप्न किती सुखवीत होतं मला ! भविष्यकालात काय होणार हे ठाऊक असतं का मनाला ? पण भविष्यकाळची गोड चित्रं रङ्गवीत असतो ना मनुष्य ? ते तरी एक स्वप्नच नाही का ?

परवाचीच गोष्ट. माझा मित्र आला त्या दिवशी त्याच्याशी गप्पा मारण्यात गुङ्गून गेले मी. मागच्या आठवणींनी -- जुन्या घडलेल्या प्रसङ्गांच्या स्मृतींनी -- मन भरून गेलं माझं ! त्याचा गोड सहवास आठवला मला. टेबलावर डोकं, ठेवून किती वेळ रडले, पण किती समाधान वाटलं ! तो निघून गेला तरी त्याच गोड गुङ्गीत-स्वप्नात मन डोलतं--होतं माझं ! भूतकाळचं स्वप्न ! मृगजळ आणि स्वप्न सापडलय् कधी कुणाला ? पण आनन्दाच्या आभासात मन क्षणभर रमत नाही का ?

रात्रीच्या स्वप्नापेक्षा जागेपणची स्वप्नं भारी आवडतात मला ! झोपेत स्वप्न पडणं हे काही आपल्या हाती

नसतं पण जागेपणी मात्र इच्छा असेल तशी स्वप्नं पडतात! झोपेतील स्वप्न भयानक असू शकेल, निराश करणारं असेल पण जागेपणीचं स्वप्न नेहमीच गोड असतं. मग ते भविष्य-काळचं असो अगर भूतकाळचं असो! पुराणात उषेला अनिरुद्धाची प्राप्ती स्वप्नात झाली असं म्हणतात, पण मला नाही ते खरं वाटत. अत्यन्त आनन्दाची गोष्ट घडली की, मनुष्याला 'आपण स्वप्नात तर नाही ना?' असा भास होतो. उषेचंहि तसचं झालं नसेल कशावरून?

कलाकृति तरी काय? कलावन्ताला पडलेली सुन्दर स्वप्नंच नाहीत का? स्वप्नतरङ्गात मन गोड हेलकावे खात असताना, चितारलेली स्मृतिचित्रं, तीच ना त्यांची कला? कुठल्या तरी अस्पष्ट, धुन्द पण मधुर वातावरणात विहार करताना घेतलेले अनुभव, तीच ना कला? यापेक्षा कलेचं कोणतं स्वरूप असणार? कलेला स्वप्नापेक्षा जास्त निराळं स्वरूप आहे असं नाही मला वाटत. फरक इतकाच, स्वप्नाचा आनन्द क्षणापुरता तर कलेचा अविनाशी. स्वप्न व्यक्तीपुरतं तर कला विश्वाची. कलेत कलावन्ताला मारून टाकण्याचं सामर्थ्य आहे, स्वप्नात सामान्य माणसाला.

सृष्टि हे सुद्धा निसर्गाला पडलेलं एक गोड स्वप्नच नाही तर काय? निळ्या नभाची दुलई पाङ्घरून निसर्ग अनन्त काळ झोपला आहे. पण सृष्टीचे देखावे क्षणोक्षणी

बदलत असतात. प्रभातकालची उषेच्या कपोलावरील गुलाबी छटा, माध्यान्हीची रूक्षता, सन्ध्येची मधुर नि हुरहुर उत्पन्न करणारी आरक्तता, वसन्ताचा मुग्ध शृङ्गार, वर्षाकालाचं ताण्डवनृत्य, शिशिराचा प्रौढपणा–किती तरी अशी स्वप्नं निसर्ग अनुभवीत आहे !

मनुष्याचं आयुष्य हे सुद्धा एक धावतं स्वप्नच नाही का ? रात्री सुखदुःखांच्या स्वप्नांची साखळीच चालू असते. तशीच आयुष्यात एकामागून एक स्वप्नांची साखळीच चालू असते. फरक इतकाच की, रात्रीची स्वप्नं डोळे मिटल्या-बरोबर सुरू होतात व उघडले की सम्पतात, तर आयुष्याची स्वप्नं डोळे उघडले की, सुरू होतात व मिटले की, सम्पतात. आयुष्य असं गोड स्वप्नमय आहे नि म्हणूनच दुःखानी दुखावलेला जीव त्या स्वप्नाच्या गुङ्गीत पडून रहातो आणि त्यातच त्याला अवर्णनीय आनन्द होतो.

 

## ३ : : : : : : मैत्री

ऊन्ह म्हणजे मी म्हणत होतं दुपारच्या वेळी! समोरच्या वृक्षावर दोन पाखरे येऊन बसली. दोन-तीन क्षणच ती एकमेकाजवळ बसली होती. तोण्डानं कसला तरी चमत्कारिक आवाज करीत नाचली इकडून तिकडे थोडा वेळ, अन् शेजारीच असलेल्या पाण्याच्या झऱ्यात झर्कन् पङ्ख ओलावून भुर्कन् निघून गेली आपल्या व्यवसायाला! दमली असतील बिचारी! पण तेवढ्या सहवासानं आनन्दाच्या गुजगोष्टीनं शीण घालवून नव्या उत्साहानं प्रमुदित होऊन

गेली ना ती? किती निर्मल आनन्द अशा स्नेहात! स्वार्थाची भावना नाही–त्यागाची अपेक्षा नाही. व्यवहारात अशा निःस्वार्थी आणि सौख्यदायक स्नेहाची अपेक्षा करता येईल का? निःस्वार्थी स्नेहभाव मिळेल का व्यवहारी जगाच्या बाजारात?

गुलाबाचं फूल ताटव्यातून काढताना काट्याशीच फार सम्बन्ध येतो. केतकीच्या बनात किती कृष्णसर्प असतात! जगाच्या अथाङ्ग समुद्रात मनुष्य हा पाणबुड्या आहे. खऱ्या मित्राचे मोती शोधून काढायला किती सङ्कटातून जावं लागतं त्याला! कुणी तरी असं म्हटलय–कुणी तरी का आपले खाण्डेकरच असं म्हणतात की, मैत्री हा डिङ्क आहे. पण मी म्हणते मैत्री म्हणजे सिमेन्ट कॉङ्क्रीटच! सिमेन्टला जसं पाणी लागतं घट्ट घट्ट व्हायला त्याप्रमाणच अश्रु-जलाच्या सिञ्चनाशिवाय हृदयाचं बंधन दृढ होत नाही. भट्टीत तापविल्याशिवाय सुवर्णाची कसोटी लागत नाही. मैत्रीची कसोटीसुद्धां संकटाच्या भट्टीशिवाय नाही लागत. म्हटलंच आहेना – A friend in need is a friend indeed.

बालपणीची मैत्री अढळ असते म्हणतात; पण मला नाही पटत हे. लहानपणी मित्र निवडायची पारख असते का आपल्या अङ्गात? लहानपणचं जग किती संकुचित असतं!

पाण्यात दगड टाकला की, त्याची वर्तुळं वाढत वाढत जावीत तशीच काहीशी स्थिति मनुष्याची असते. वाढत्या वयाबरोबर त्याच्या अनुभवाचं, ज्ञानाचं आणि जगाचं क्षेत्र वाढत जातं आणि लहानपणीच्या मैत्रीचे बुडबुडे फुटून जातात. मैत्री ही अनुभवाच्या अढळ पायावर अधिष्ठित होणं चांगलं, नाही का? Gerald Griffin ने कुठंस म्हटलं आहे --

League not with him in friendship's tie,
Whose selfish soul is bent on pleasure;
For he from joy to joy fly,
As changes fancy's fickle measure.

अगदी खरं आहे त्याचं म्हणणं. पण मला आपलं वाटतं की, मैत्री करू म्हणता करता नाही येणार! मैत्रीत वयाचा, ज्ञानाचा, श्रीमन्तीचा, गरिबीचा अगर सत्तेचाहि प्रश्न नसतो. प्रश्न असतो हृदयांचा. दोन हृदयांचं एकीकरण, त्यांची एकतानता हीच मैत्रीची व्याख्या. शेक्सपिअर म्हणतोच ना - Friendship is one mind in two bodies. अशी मैत्री जमायला, सहवासाची अपेक्षा असावी का? ओळखीची असावी का? एकत्र जमणारी माणसं मित्र असती तर जगात शत्रूची केवढी वाण भासली असती!

जीवनाच्या प्रवाहात पोहताना दुबळ्या जीवाची कोण

ताणाताण होते! कधी सुखाचीं आन्दोलनं तर कधी दुखाचे खडक वाट्याला येतात. अशा वेळी आपल्या हृदयाशी सह-संवेदन पावून कुणी सुखदुःखात सहभागी होईल का, हे पाहण्यासाठी त्याची दृष्टि किती आसावलेली असते! मैत्रीची आवश्यकता याचसाठी की, सुखाचा आनन्द द्विगुणित करावयाचा अन् दुःखाची तीव्रता कमी करावयाची! जीवन-सङ्गीताची स्वरसंगति ( Harmony ) अशा विशुद्ध मैत्रीत असते. समुद्रात खलाशाला इशारा द्यायला दीपस्तम्भ असतो, नाही? जीवनात सुद्धा मित्र हा दीपस्तम्भ असतो. जगात मित्राशिवाय मनुष्य म्हणजे मोत्याविना शिम्पला! विवाह ही सुद्धा एक प्रकारची मैत्रीच नाही का?

विषय जरी एकच असला तरी प्रत्येकाच्या अनुभूती-प्रमाणे त्याची माण्डणी-विचारसरणी भिन्न होऊं शकते. "मैत्रीच्या जगात २४ तास चान्दण असतं, तिथं सदा वसन्त ऋतूच असतो. उन्हाळ्याचा रखरखीतपणा अगर हिवाळ्याचा रूक्षपणा नाही आढळायचा तिथं. आसमन्तात सदा प्रेमाची चिनकाटेरी फुलं उमललेली असतात" असं मी एकदा चित्रेला—माझ्या मैत्रीणीला—लिहिलं होतं. तिनं काय उत्तर धाडलं सांगू का? ती लिहिते, "वेडी आहेस तूं सागरिके. मैत्रीच्या जगात नियती, अमावास्येचा अन्धार उत्पन्न करते. मैत्रीचं निरभ्र आकाश दुःस्थितीच्या कृष्ण-

मेघानी व्याप्त होतं. जिथं चन्द्राचं मुखसुद्धा दिसायची पञ्चाईत तिथ त्याचं मधुर हुरहुर उत्पन्न करणारं चान्दणं कुठून मिळायला? विजेच्या चाबकाच्या फटकाऱ्यानी मेघानासुद्धा हुन्दका अनावर होतो मग यःकश्चित् मानवी मित्रांची गोष्ट काय वर्णावी? मैत्रीमुळं जगात अङ्गावर शहारे आणणारे–हृदयाला थरकाप उडविणारे कुचेष्टेचे झोम्बरं वारे वाहूं लागतात. तिथं वर्षाऋतू सुरू होतो. मैत्रीच्या हास्याची नाजूक फुलं कर्दमात पायदळी तुडविली जातात. तिथं नेहमी मेघांच्या सहस्र नयनातून ओसण्डणारी अश्रूंची वृष्टि असते··· " मित्राकरिता रडण्याचं समाधान असतं हे मात्र तिला पटलं! एकाच विषयाकडे पहाण्याच्या तिच्या नि माझ्या दृष्टिकोनात किती फरक आहे, म्हणून आमच्या मैत्रीत नाही त्यामुळं उणेपणा येत. मृत्यूच्या निःस्वार्थी मैत्रीची कल्पना त्या चिमुकल्या जिवाला भारी आवडली. दुर्दैव!! मृत्यूकडे पहाण्यातसुद्धा दृष्टीची भिन्नता असतेच की! कुणाला तो शत्रूसारखा वाटतो तर कुणाला तो प्रिय मित्रच वाटतो. आणि खरं आहे ते. साऱ्या जगानं आपणाला सोडलं तरी मृत्यु आपला त्याग नाही करीत. तोच शेवटी आपला सोबती होतो. 'मृत्यू किती सुन्दर आहे!' असं शेलेलासुद्धा वाटलं. खरंच, अगदी निःस्वार्थी नि निर्व्याज मैत्री असते त्याची!!

## ४ : : : अमावास्येची रात्र

एका संस्थेतर्फे आगरकरांची पुण्यतिथी साजरी होणार होती. मीहि काही मैत्रिणीसह गेले होते. परत येताना रात्र झाली होती. माझ्या बरोबरीच्या मुलीपैकी एक मुलगी म्हणाली 'अमावास्या नाही का ग आज? तरीच इतका दाट अंधार पडलाय!' मी 'हो' म्हटलं पण 'अमावास्या' या शब्दाने माझ्या मनात आगरकरांच्या विषयी विचार चालले होते. त्याना दुप्पट चालना मिळाली. आगरकर! महाराष्ट्रातील थोर विभूति! पण त्या व्यक्तीला

विभूतिमत्व मिळविण्याला जिवाचे रान करावे लागले. त्यानी कष्टाची अमावास्या, दारिद्र्याची अमावास्या सहन केली म्हणूनच ही त्यांच्या कीर्तीची पूर्णिमा पसरली. गोखले, टिळक, फार काय सर्व मोठ्या लोकाना अशीच खडतर तपश्चर्या करावी लागली तेव्हांच कुठे त्यांचे कीर्ती-मन्दिर उभारले गेले. मी घरी आले पण डोक्यातले विचार काही केल्या जाईनात. अमावास्या! सगळयाची इथूनतिथून नावडती, पण आश्चर्य हे की, असं काही कुणाच्या मनात येत नाही की या अमावास्येच्या रात्री-तूनच पुढे आल्हाददायक चन्द्रतारकांचा उदय होतो. कौरवपाण्डवांच्या युद्धाच्या वणव्यातूनच सर्व जगाला मार्गदर्शक अशी भगवद्‌गीतेची तेजस्वी ज्योत निर्माण झाली. मुसलमानानी हिन्दुस्थान पादाक्रान्त केला तेव्हां सर्व हिन्दूंच्या मनात स्वाभिमानशून्यतेची अमावास्या पसरली, पण त्या अन्धारातूनच स्वराज्याची चन्द्रिका निर्माण झाली. कवीच्या आन्तरिक निराशेमधून सर्व जगाला वेड लावण्यासारखे काव्य उत्पन्न होते. वाइटातून चाङ्गलं निघतं ते हे असं!

शेक्सपिअरनं जगाला रंगभूमि म्हणून सम्बोधिलं! अन् खरोखरच समर्पक उपमा आहे ही! मानवी जीवनाच्या नाटकाला सुखदुःखांची पार्श्वभूमि उठाव आणते. खऱ्या

रङ्गभूमीप्रमाणे तिलाहि पार्श्वभूमी लागतेच. मनुष्याने दु:खाच्या नावाने खडे फोडून सुखाचे देव्हारे माजविण्यात काय अर्थ आहे? जगात कुरुपता नसती तर सौन्दर्याला कुणी विचारलं असतं का? उन्हातून गेल्याशिवाय मनुष्याला सावलीचं सुख कळत नाही. त्याप्रमाणेच सुखाला दु:खाची जोड नसती तर सुखाची किम्मत कवडीमोलच ठरली असती. सुख व दु:ख सापेक्ष आहेत. त्याचप्रमाणे अमावास्या व पूर्णिमा दोन्ही सापेक्ष आहेत.

मी एक गोष्ट कुठं तरी वाचली होती! एका मनुष्याला नन्दनवनात रहाण्याची फार इच्छा झाली. तो कण्टाळून गेला होता मृत्युलोकच्या दु:खाना! दैववशात तो नन्दनवनात गेला. नन्दनवनच ते! काय कमी आहे तिथं? सुन्दर अप्सरा, कर्णमधुर सङ्गीत, झोपायला मऊमऊ पराच्या गाद्या, खाण्याला पञ्चपक्वान्नं, सुन्दर सुन्दर सुवासिक फुलं, अन् पुण्यवान (?) देवांचा सहवास; चङ्गळ होती त्या गृहस्थाची. पण गम्मत ही की, तिथं गेल्यापासून अगदी थोड्याच दिवसानी स्वारी मृत्युलोकावर जाण्याच्या तयारीला लागली. देवानी विचारलं 'कुठं जातोस रे बाबा?' तर हा उत्तर करतो, 'जातो मृत्युलोकाला!' देव विचारतात 'का रे?' तो मनुष्य उत्तरला ते तुम्हाला नाही कळायचं! दु:ख व त्या दु:खाचं सौख्य अनुभवायला

मृत्युलोकावरच जन्म घ्यायला हवा' ह्या गोष्टीप्रमाणेच अमावास्येचेहि आहे. सतत पूर्णिमेची अपेक्षा केली तर खात्रीने तिला आपण कण्टाळून जाऊ. सुख आणि दुःख, अमावास्या आणि पूर्णिमा, उत्कर्ष–अपकर्ष, उन्हाळा आणि पावसाळा ही परस्पराना सापेक्ष आहेत.

माझे हे विचार किती लाम्बले असते कुणाला ठाऊक इतक्यात एका लहान मुलानें—

Full many a gem of purest ray serene.
The dark unfathomed caves of ocean bear.

ही कविता मोठमोठ्याने घोकण्यास सुरवात केली. माझी विचाराची साखळी तुटली; पण अस वाटलं की अमावास्येच्या बाबतीत याच ओळी जरा निराळ्या अर्थाने म्हणता येतील, नाही का? अफाट समुद्राच्या अन्धाऱ्या तळाशी कित्येक तेजस्वी रत्ने असतात. तसेच या अमावास्येच्या तमस्सागरात शुक्लपक्षातील तारका व चन्द्र लपलेली असतात, नाही का? फरक इतकाच की समुद्रातील सर्वच रत्ने बाहेर येत नाहीत; पण ही सर्व बाहेर पडतात.

  

## ५ : : : : : : भावना

परवाच्या वृत्तपत्रात मी वाचलं! भावनेच्या भरात एका तरुणाची आत्महत्या! एकच क्षण; पण त्या क्षणाला मनुष्य स्वतःचं अमोलिक आयुष्य गमावतो, हे चाङ्गलं का वाईट? याचं उत्तर मला तर सुचत नाही. कदाचित् भावनेच्या उदात्ततेवर याचं उत्तर अवलम्बून राहू शकेल.

जगातील यच्चावत् व्यवहार मनुष्याच्या भावनेवरच नाहीत का चालू असत! तारायन्त्राप्रमाणंच भावनांचं जाळं दूरवर पसरलं आहे. हे रेशमी धागे प्रत्येक मनुष्याचं जीवित

दुसऱ्याच्या जीविताशी निगडित करतात, म्हणूनच मनुष्य जगतो, नाही का ? पृथ्वीच्याभवती असङ्ख्य पदार्थांचं वलय आहे, पण त्यांचं आकर्षण एकाच बिन्दूत स्थिर झालेलं आढळून येतं ! मानवी भावनांचं देखील असंच आहे. त्यांचं जाळं जरी दूरवर पसरलं असलं, तरी अन्तः-करणाच्या ठिकाणी त्या केन्द्रित होतात. हे भावनांचं जाळं कोळ्याच्या जाळ्याप्रमाणं विस्फारून टाकता येतं. भाव-प्रेमाच्या जाळ्यात अनेक माशाना धरता येतं नि हवं त्या वेळी जाळं काढून घेता येतं.

भावना ही देवता का राक्षसी ? काल जिवलग मित्र म्हणून मिरवले जाणारे, आज एकमेकांचं मुखावलोकनहि करण्यास तयार नसतात. कदाचित् आजचा शत्रू उद्याचा जिगरदोस्त ठरणार नाही कशावरून ? ज्या भावनेनं आपण दुसऱ्याकडे पाहू त्या भावनेवरच सर्व काही अवलम्बून असतं. 'भाव तिथं देव' असं सन्तानीच नाही का म्हटलं ? जिथं भावना तिथंच देवाची वसती. पण्ढरीच्या विठोबात साऱ्या महाराष्ट्राचा भोळा भाव साभावला आहे, म्हणूनच त्याच्या पायावर मस्तक ठेवण्याकरिता जीवांची एवढी धडपड चाललेली असते.

सर्वात इच्छाशक्ति प्रबळ म्हणतात, त्याचं कारण हेच की, इच्छेच्या पोटीच महत्त्वाकाङ्क्षेचा जन्म. इच्छा ही

महत्त्वाकाङ्क्षेची जननी व महत्त्वाकाङ्क्षा उत्कर्षांचं मूळ आहे. भावनेची ही सोपानपरम्परा आहे. या भावनेच्या परम्परेतच मनुष्याच्या उत्कर्षाचं अगर अपकर्षांचं सार साठवलं आहे. Not failure, but low aim is crime म्हणतात. अपजयाचं दुःख नाही पण क्षुद्र ध्येयदृष्टि हा गुन्हा ठरतो. मनुष्याच्या अधःपतनाची ही पायरी असते, नाही का ?

भावनांच्या लाटावर मानवी जीविताचं तारू चालतं. भावनेचे हेलकावे जसजसे बसतील तसतसे मनुष्याच्या जीवनाला धक्के बसत असतात. अत्यन्त भावनाप्रधान मनुष्य म्हणजे काचेचं भाण्डं. जरा धक्का लागला, की चक्काचूर व्हायला वेळ नाही लागायचा ! सूर्य जर नसता तर जग चाललं असतं का ? भावनेचंहि असंच आहे. पण सूर्या-सारखी भावना तापदायक नसते; चन्द्रासारखी शीतल पण सूर्यासारखी जीवनसंवर्धिनी आहे ही. भावना ही देणगी जर मनुष्याला नसती तर प्रेमाची व सौख्याची किरणं त्याला कुठून लाभली असती ? नि मग मनुष्यात नि पशूत काय फरक राहिला असता ? सौन्दर्यगुण हे वस्तूचे गुणधर्म नसून अन्तःकरणाचे धर्म आहेत म्हणतात ते खोटं नाही काही ! तसेच भावना आहे त्या ठिकाणी सत्य आहे, शिव आहे नि सौन्दर्यहि आहे.

शेकडो सुवासिनींच्या पञ्चारती मातेच्या प्रेमळ नेत्रज्योतीपुढं फिक्या पडतील. घरातील ओली-कोरडी भाकरी बाहेरच्या पञ्चपक्वान्नाहून सरस ठरते. कारण काय ? त्यांच्या पाठीमागं प्रीतीच्या कोमल भावना असतात. आपल्यासाठी रडणारी माणसं सुद्धा पाहण्यात एक प्रकारचा अननुभूत आनन्द होतो. याचं कारण एकच आणि ते म्हणजे, भावना ! भावना प्रीति निर्माण करते, भावना नाती निर्माण करते, भावना कल्पनेला जन्म देते. भाव-भावनांच्या वादळातूनच कल्पनेची चित्तवेधक सृष्टि उत्पन्न होते. भावना नीति उत्पन्न करते ! भावनेच्या तरङ्गावरच सत्कार्यांची कमलं फुलत असतात; आणि भावनेच्या तरङ्गावरच कुकर्मांचं शेवाळ पसरलेलं असतं. बुद्धाच्या सद्भावनातूनच जगावर शान्तता प्रस्थापित झाली व नेपोलियनच्या आसुरी भावनेनच जगाला भाजून काढलं. म्हणून सद्भावनांचं अधिष्ठान आहे तिथंच उत्कर्ष आहे. वाईट भावनांचं उच्चाटन होऊन चाङ्गल्या भावना रुजल्या तर जगाचं नन्दनवन बनायला वेळ लागेल का ? पण हे आपल्या हातात आहे कुठं ?

  

## ६ : : : : : लपण्डाव

परवा आम्हा मैत्रिणींमध्ये बोलता बोलता असा वाद निघाला की, कॉलेजातील मुलं फाजील असतात म्हणून. आमच्यापैकी एक सोवळी शिष्ट म्हणाली, " जिथं आम्ही जाऊ तिथं ही मुलं हजर असतात. त्यांना मुली-शिवाय दुसरा विषयच नाही! म्हणतात ना 'यत्र यत्र धूमः तत्र तत्र वह्निः' मी सुद्धा एक म्हण केली आहे हं 'जिथं जिथं रमणी तिथं तिथं कॉलेजकुमारांची टेहेळणी.' आम्ही हसलो नि तिथंच आमची बैठक सम्पली. पण

माझ्या डोक्यातून काही हा विषय गेला नाही. मला वाटलं की, नेहमी या मुली मुलांच्या विरुद्ध तक्रार करतात, त्या अगदी मनापासूनच का? मुळीच नाही. कारण असं जर आहे, तर त्या इतकी सौन्दर्याच्या उपासनेत दक्षता का घेतात? नि आपल्याकडे कुणाचं लक्ष आहे की नाही याकडे तरी तिरक्या नजरेनं कशाला पाह्यचं? साराच लपण्डाव–पण लपण्डाव असला तरी तो गोड आहे यात शङ्का नाही. लहान मुलं नाही का लपण्डाव खेळत? त्यापैकीच हा प्रकार, नाही का? तसं पाहिलं तर जीवित हा सुद्धा लपण्डावच नाही का? एका व्यक्तीनं दुसऱ्या व्यक्तीची भुलावण करीत आपलं साध्य साधायचा प्रयत्न करायचा ही गोष्ट आपल्या पदोपदी प्रत्ययास येते. व्यवहारात असे लपण्डावाचे खेळ प्रत्यही चालतात. बहीण-भाऊ, पति-पत्नी, आई बाप, शिक्षक-विद्यार्थी, मित्र-मैत्रिणी यामध्ये एकेक प्रकारचा लपण्डावच चालू असतो, नाही का? पण व्यवहारात हा लपण्डाव खेळताना बालकाची निर्व्याजता असली, तरच त्याचा परिणाम सुखदायक होतो. मुलं नाहीत का लपण्डावाच्या क्षणाच्या फसवणुकीत आनन्द मानून घेत? पण त्या आनन्दात कापट्याचा लवलेशहि नसतो. निर्व्याज आनन्दाची गुरुकिल्ली अशा गोड फसवणुकीत असते. पण दुर्दैव! व्यवहारी जगात नाही हं

ही गोष्ट दिसून यायची! मानवी जीवनात दैव नि सुख यांच्या लपण्डावात, बिचाऱ्या दैवावर डाव उलटून त्याच्यावर सुखाला शोधून काढण्याचा प्रसङ्ग येतो. या प्रयत्नात बिचाऱ्याला सुख काही शोधून काढता येत नाही.

नदीचं मूळ नि ऋषीचं कुळ शोधू नये म्हणतात! मी तर असं म्हणते की सुन्दर नि पवित्र दिसणाऱ्या प्रत्येक गोष्टीचं मूळ शोधण्याचा शाहण्यानं प्रयत्न करू नये. वरून प्रशान्त नि गम्भीर दिसणाऱ्या डोहात किती भीषण नि क्रूर नक्र वस्ती करीत असतील? विविधरम्य आकार नि मनोहर रङ्ग धारण करणाऱ्या मेघांच्या अन्तरङ्गात चराचराना जाळून भस्म करणारी विद्युत्शक्ति वास करीत असते. गर्द हिरव्या रङ्गानं नेत्राना आल्हादित करणारी वनराजी विषारी फुत्कार टाकणाऱ्या भुजङ्गांची नि विक्राळ जिभानी लवलवणाऱ्या क्रूर श्वापदांची जननी असते. मनुष्यप्राणीहि असाच नाही का? 'ओठावर मनोवेधक हसू पण हृदयात हलाहल तसू तसू' अशीच जगाची रीत असते. Language is the art of concealing thoughts ही उक्ति सार्थ नाही असं कोण म्हणेल? स्वतःच्या भावना शद्बांच्या थडग्याखाली लपवून जगाला कवित्वाचे ताजमहाल कलावन्त दाखवितात; नि म्हणूनच त्याचा उदोउदो होतो. भल्याबुऱ्या कल्पनाना सत्यस्वरूप देणाऱ्यांची जगात

नेहमी रेवडी उडते. वस्तूचं वास्तव स्वरूप लपवून कृत्रिमतेनं वास्तवाचा आभास निर्माण करणं यालाच कलावन्त कला म्हणतात. इथून–तिथून सारा लपण्डावच नाही का! जगातील अन्याय, कृत्रिमता, विषमता, चव्हाट्यावर आणील तो पापी, हाच जगाचा न्याय दिसतो, नाही का?

मला वाटतं परमेश्वराला सुद्धा असा लपण्डाव आवडतोसा दिसतो. ॲडम आणि ईव्हला अज्ञानात ठेवून स्वतः निर्माण केलेल्या सृष्टीतील ज्ञान प्रकट करायचं नव्हतं म्हणूनच ना त्यानं ज्ञानवृक्षाचं फल त्या जोडप्यानं खाऊं नये म्हणून इतकी दक्षता घेतली होती? पण शेवटी आपलं बिङ्ग बाहेर पडलं म्हणून अखिल मानवजातीला कोण भयङ्कर शापानं आज हजारो वर्षं खितपत ठेवलं आहे! 'Ignorance is bliss' म्हणतात ते काही खोटं नाही. मनुष्य भविष्यकाळाची चित्रं रेखाटत असतो ती किती रमणीय असतात! पण ती अज्ञात असतात तोपर्यन्तच्च गोड असतात. प्रत्यक्ष परिस्थिति अनभवू लागताच त्यातील कटुता जाणवते व जीवित कन्टाळवाणं होतं. बालकांचं जोवन किती गोड! फसविण्यात आनन्द नि स्वतः फसल्यावर त्यातहि आनन्द!

निसर्गाकडे पाहिलं तरी काय आढळून येतं? सर्व सृष्टीची रचनाच लपण्डावाच्या तत्त्वावर झाली आहे की

काय असा भास होतो. जगाच्या उत्पत्तीपासून ग्रहगोलांची जी धावपळ चालू आहे ती अद्यापिहि कायम आहे. बिचाऱ्याना अजूनहि कोणीच सापडलं नाही. तसाच लपण्डाव चन्द्रचान्दण्यांचा विरल आभ्रपटलामागं चालू असतो. एखादं नाजूक फूल पर्णांच्या आड लपून रसिकाच्या शोधक नजरेशी लपण्डाव खेळत असतं. धावत्या प्रकाशाला पकडण्यासाठी छायेची धडपड चालू असते.

मानवी मनाचे खोल कप्पे उघडून पाहिले तर अशा अनेकविध लपण्डावांची पूर्वतयारी तिथं चालू असलेली दिसेल. मनुष्य स्वतःच्या मनाची सुद्धा अशीच फसवणूक करून घेतो, पण मरीचिकेमागं धावणाऱ्या कुरङ्गाप्रमाणं त्याची अवस्था होते. लपत-छपत जाणारी धावरी आशा, मनुष्याची अशीच भुलावण करीत असते; व त्या गोड फसवणुकीत मनुष्य गुङ्गून जातो. अशाच प्रकारची कडूगोड भुलावण मानवी जीवनात आहे म्हणूनच जीवन सुसह्य झाले आहे छाया—प्रकाशाच्या अखण्ड लपण्डावासारखा मानवी जीविताचा लपण्डाव सतत चालू आहे म्हणूनच भोळया आशेच्या लपण्डवात मानवी मन गुङ्गून जातं.

  

## ७ : : : : : आनन्द

आमच्या शेजारी नारूतात्या नावाचे एक गृहस्थ आहेत. केव्हांहि त्याना विचारा 'कसं काय तात्या, ठीक आहे ना?' त्यांचं एक ठराविक उत्तर असतं नेहमी, 'कसलं बरं नि कसलं वाईट? जगण्यात काही स्वारस्य नाही पहा! आला दिवस ढकलायचा!' वास्तविक तात्यांना काही कमी आहे अशातला भाग नाही, पण जीविताविषयी कुरकुर करण्याची सवयच नेहमी! केव्हांहि पहा त्यांचा चेहरा नेहमी दुर्मुखलेलाच दिसायाचा. बरं, याच्या उलट आमचे

मास्तर. परिस्थिति विशेष समाधानकारक नसताना गृहस्थ नेहमी आनन्दी ! एक दिवस सुद्धा कुरकुर नाही त्यांची. ही दोन परस्परविरोधी स्वभावाचित्रं पाहिली, की असं वाटतं आनन्द मानण्यावर आहे, नाही का ? ज्या रंगाचा चष्मा वापरावा त्या रङ्गाचं जग दिसत. जीवनाकडे पहाण्याची जशी दृष्टि असेल त्याप्रमाणे त्याला आनन्द किंवा दुःख होणार. आयुष्यात वागण्याची पद्धति हंसासारखी असावी. जीवनातील दुःखाचं पाणी बाजूस सारून आनन्दाचं दूध मात्र प्राशन केलं तरच आपला निभाव लागेल.

आयुष्यात सर्वच गोष्टी आपल्या मनासारख्या कशा होणार ? कधी आनन्द तर कधी दुःख ! लहानपणी पाठ-शिवणी नाही का आपण खेळत ? तशीच–अगदी तशीच जीवनाच्या प्राङ्गणात आनन्ददुःखाची–हर्षशोकाची पाठ-शिवणीच चालू असते एक प्रकारे ! त्यामध्ये आपण खेळाडू वृत्तीचा अङ्गीकार केला नाही तर जीवित सुखमय होणं शक्य आहे काय ? जगातील कटु प्रसङ्गावर आन्द-दाच्या शर्करेची पुटं चढवल्याशिवाय जीवितयात्रा सुखमय होणं शक्य आहे का कधी ?

संध्यासमयी सृष्टीचा चित्रकार आपल्या किरण–शलाकेनं विविधरम्य चित्रं रङ्गवीत असतो. पण तिकडे पाहिलं तरंच ना त्यातील रम्यता प्रतीत होणार ! उषः-

कालच्या वातावरणात मृदुमधुर हास्यात किती निर्व्याज आनन्द भरलेला असतो; पुष्पांचा मधुमत्त सुगन्ध, पक्षांचं उन्मादक कूजित, भ्रमरांचा मधुर गुन्जारव, किती तरी आल्हाददायक गोष्टी सभोवार आहेत. पण हे सर्व कुणासाठी? ज्याला त्याचा आस्वाद घेता येतो त्यासाठीच फक्त! इतर मात्र दुःखाचे भारवाहक! बालकवीच्या बालसदृश दृष्टीला जिकडे तिकडे आनन्दच भरून राहिलेला दिसत होता. त्या आनन्दाचे सेवन करता करता त्यांच्या सर्व वृत्ती आन्तर्बाह्य आनन्दमय झाल्या होत्या म्हणूनच त्यांच्या दृष्टीला—

**आनन्दी आनन्द गडे। इकडे तिकडे चोहिकडे॥**

असाच दिव्य भास होत होता. चराचरातील आनन्द अनुभवण्याची पात्रता यायलासुद्धा मनाची शुद्धता व समता प्राप्त करून घ्यायची हवी!

कधी कधी एकाचा आनन्द दुसऱ्याच्या दुःखातून जन्म पावतो. वेलीना दुखवून फुलांचा परिमल आपण सेवन करीत नाही का? खलील गिब्राननं एक मार्मिक गोष्ट लिहिली आहे. "एक इसम मृत्यु पावतो. त्याच्या अन्त्यविधीसाठी कोष्टी कापड देतो, सुतार शवपेटिका तयार करून देतो व मजूर खड्डा खणतो. तिघानाहि भरपूर मजुरी मिळाल्यामुळं ते मिळून कलालाच्या गुत्यात गेले. यथेच्छ भोजन केल्यावर त्यानी भरपूर दारू झोकली. सारे पैसे

उडविले. कलालीण नवऱ्याला म्हणाली 'किती दिलदार आहेत हे लोक ? रोज रोज असंच नशिब घरास चालून आलं तर आपल्या बाळाला खूप खूप शिकविता येईल नि मग तो धर्माधिकारी होईल, नाही ?' दोघंहि भावी सुखाशेच्या आनन्दात दङ्ग झाली." आनन्द नि दुःख यांचा असा खो खोचा खेळ चाललेला असतो. 'पन्त मेले नि राव चढले' असाच प्रकार चालतो. आनन्द व दुःख यांच्या खेळाचा हा चमत्कारिक प्रकार पाहिला म्हणजे मन उदास होतं ! अगदी खरं आहे ! म्हणून तर जीवनाकडे पाहण्याच्या दृष्टीकोनात आपण फरक करायला हवा. सौन्दर्यसमीक्षा तेवढ्यासाठीच हवी, वस्तु-वस्तूतील सौन्दर्य हुडकण्यास शिकायला हवं, मार्मिकपणानं अनुभवायला हवं, त्याचा आस्वाद घ्यायला पाहिजे.

सौन्दर्यपूर्ण गोष्टी आनन्दाचं एकमेव निधानच असतात. रमणीचं सौन्दर्य, निसर्गाचं सौन्दर्य, मानवी कलाकृतीचं सौन्दर्य यांचा हेतु व परिणाम फक्त एकच अन् तो म्हणजे आनन्द ! सौन्दर्यदर्शन केव्हांहि आल्हाददायकच होतं. मग ते नेत्राचं असो, स्वरमाधुर्याचं असो; बुद्धिचं असो अगर अन्तःकरणाचं असो. कीट्स म्हणतोच ना

A thing of beauty is joy for ever;
Its loveliness increases;

It will never pass into nothingness
ही उक्ति सार्थ नाही असं कोण म्हणेल ?

वाढत्या वयाबरोबर आनन्दाची साधनंहि बदलत असतात, पावसाळ्यात साचलेल्या पाण्यात नावाची स्पर्धा लावताना पोरकटपणाचा आनन्द होतो. त्याच्या उलट तरुणींच्या उन्मादक लोचनांच्या पाण्याशी रत्नांची तुलना करण्यात तरुणाना आनन्द होतो; आणि तत्त्वज्ञानाच्या घटपटाच्या मीमांसेत वृद्धाना आनन्द होतो. ही आनन्दाची साधनं जरी वेगवेगळी भासली तरी त्याचं कार्य मात्र अभिन्नच असतं. अखिल विश्व आनन्दमय आहे. पण मनुष्य तिकडे लक्ष न पुरवता आपणाहून दुःख निर्माण करून कोळ्याच्या जाळ्यात सापडलेल्या माशीप्रमाणं गुर-फटून जातो. क्षणभर हे जग अगदी दुःखाचं सहारा वाळ-वण्ट मानलं तरी आनन्दाची पाणस्थळं हुडकून काढून त्यांचं सौख्य लुटणं आपलं कर्तव्य नाही का ? आनन्दाचा जिवन्त झरा आपल्या दृष्टीसमोर असताना दुःखाचं निष्का-रण मृगजळ उत्पन्न करून त्या आभासामागं धावण्यात काय अर्थ ?

  

# ८ : : : मेघ आणि काव्य

कोणत्याशा गृहस्थाला मेघ दिसले की, त्याच्या मेन्दूत विकृति उत्पन्न होत असे म्हणे, नि मग तो वेडेचार करावयास लागे. मी ही गोष्ट ऐकली तेव्हा मला आश्चर्याचा धक्काच बसला. बाकी काव्याचं नाव काढताच कपाळाला आठ्या घालणारे रसिक नाहीत का आढळून येत ! त्यापैकीच हे गृहस्थ म्हणावयास हरकत नाही ! मेघासारखं जातिवन्त काव्य पाहून ज्याच्या वृत्ति सुखित होत नाहीत त्याची कीवच केलेली बरी !

मेघाची व काव्याची तुलना केलेली पाहून कित्येकाना जरा आश्चर्य वाटलं असेल नाही ? पण, मला खरंच मेघ हे काव्यासारखे वाटतात. अर्थात् काव्याप्रमाणं मेघ हे रसात्मक असतात, अशा कोटीचा आश्रय करून माझ्या तुलनेची यथार्थता मला पटवायची नाही ! पण मला मेघ नि काव्य यांच्यात पुष्कळच चमत्कृतीपूर्ण साधर्म्य आढळतं एवढं मात्र खरं ! याच्याही पुढं जाऊन व्यतिरेकाचा आश्रय घेऊन मी असं म्हणेन की, काव्याहून मेघच सर्व दृष्टीने श्रेष्ठ आहेत !

काव्य हे सुसंस्कृतांच्या जीवनातील एक प्रमुख आवश्यक वस्तु आहे; पण मेघ हे सर्व प्राणिमात्रांचं प्रत्यक्ष जीवनच होय ! काव्यावाचून मानवाचं चालू शकेल पण मेघावाचून चालूच शकणार नाही. हे जाणूनच प्राचीन कवींनी मेघांच्या आवाहनार्थ ॠचा रचलेल्या आहेत. त्याचा उगम जीवनाच्या तळमळीतून झाला म्हणूनच त्यात अन्तःकरणाचा जिव्हाळा दिसून येतो. मात्र आजकालच्या कवीत मेघाविषयीची ही दृष्टी आढळून येत नाही. कवि-प्रतिभेला भुलावण घालणाऱ्या अनेक विषयापैकी मेघ हा एक मोहक विषय आहे एवढंच. बाकी कविकुलगुरूनं मेघदूतासारखं नितान्तसुन्दर खण्डकाव्य लिहून मेघ नि काव्य यांची मारलेली गाठ प्रेमगाठीसारखीच अपूर्व व

मनोरम आहे हे खास !

काव्य आणि जीवन यांच्या परस्पर सम्बन्धाबद्दल आज खूप रणं माजलेली दिसली तरी मेघ नि जीवन यांच्या एकरूपत्वाबद्दल कुणीही शङ्का घेणार नाही ! काव्याला सर्वस्वी जीवनाचंच अधिष्ठान असतं असं हटकून म्हणता येणार नाही, पण मेघाना मात्र जीवनाचंच एकमेव अधिष्ठान असतं. जीवनावाचून मेघांचं अस्तित्व नाही नि मेघावाचून जीवनाचंही अस्तित्व शक्य नाही. काव्याहून मेघ सर्व दृष्टीनी श्रेष्ठ म्हणते याचं कारण हेच !

हो, काव्यावरून बरी आठवण झाली ! परवाचीच गोष्ट ! शशीला कसली लहर आली होती कुणास ठाऊक, माझ्याशी बोलता बोलता स्वारीनं काव्यावर व्याख्यान झोडण्यास सुरुवात केली. मी पडले भिडस्त, त्यामुळं त्याच्या अङ्गातील काव्यसमन्ध शान्त होण्याचं लक्षण दिसेना. त्याच्या तोण्डाचा पट्टा आडवा उभा चालूच होता. काव्याचा हेतु आनन्द हे पटविण्यासाठी ‘काव्यं सद्यः परनिर्वृतये’ म्हणून साङ्गणाऱ्या मम्मटाचार्यांपासून तो ‘सरस्वती ही पुराणिकाच्या व्यासपीठावर बसली नसून प्रमत्त मयूरपिच्छांच्या सुबक सिंहासनावर बसली आहे’ म्हणून टिच्चून साङ्गणाऱ्या प्राध्यापक फडक्यापर्यन्त अनेक साहित्यिकांच्या मताचे तुकडे तो माझ्यापुढं एकामागून एक

फेकत होता. मी अगदी रडकुण्डीला आले, तोण्ड वाईट केलं, आळस दिला पण त्याची पुरुषी अरेरावी वृत्ति तेव्हां चाङ्गलीच जागृत झालेली दिसली. मी कपाळाला खूप आठ्या घालून त्याच्याकडे नाक उडवून पाहिलं. त्याचे डोळे माझ्याकडे असले तरी मन रमलं होतं काव्यप्रयोजनात. माझे मुखावरील विकार, माझी हालचाल त्याच्या खिसगणतीतही नव्हती. मी हळूच खुर्ची फिरविली नि खिडकीच्या बाहेर पाहू लागले. ती सन्ध्याकाळची वेळ होती! आकाशमण्डपात क्षितिजवार चन्द्ररजनीच्या विवाह-प्रसङ्गी सूर्याचा सुवर्ण कलश ठेवलेला दिसला. किती रमणीय होता तो देखावा! क्षितिजावर लाम्बच्च लाम्ब पसरलेला भडक केशरी पट्टा, त्यात मधून मधून डोकावणारे काळे लहान पट्टे, वरच्या बाजूस गर्दी करून राहणाऱ्या मेघांवर फेकलेले पिवळया, गुलाबी, हिरव्या रङ्गांचे शिडकावे, सूर्याच्या मस्तकावर चमकणारा सुवर्णमुकुटासारखा एक मेघखण्ड, त्या मेघखण्डातून भेदून पूर्वेकडे धाव घेणारे किरणांचे स्रोत—ते सारं दृश्य अपूर्वच होतं! मी तर ते दृश्य पाहून आनन्दानं स्तिमितच झाले. चिरचिरणाऱ्या लहान मुलापुढं रङ्गीबेरङ्गी खेळणी टाकल्यावर ते मूल जसं हर्षभरित होतं तशी माझी स्थिति झाली. माझ्यासमोर नभःप्राङ्गणात मेघांची रङ्गीबेरङ्गी खेळणी पडली होती! प्रतिक्षणाला त्या

खेळण्याचे आकार नि रङ्ग बदलत होते. सौन्दर्याचा-आनन्दाचा-खजिना माझ्यापुढं खुला होता. माझे नेत्र ते अपूर्व सौन्दर्य आधीरतेनं प्राशन करीत होते. शब्दकाव्याच्या प्रवचनात न रङ्गणारं माझं मन मेघकाव्याचं सौन्दर्य लुटित होतं. शशीचं तोण्ड बन्द होऊन तोही ते दृश्य पाहण्यात केव्हां दङ्ग झाला होता याची मला कल्पनाही नव्हती. काव्यापेक्षा मेघांचे चित्रविचित्र खण्डच सद्यः परनिर्वृति प्राप्त करून देतात याची सत्यता त्याच्या प्रसन्न मुखावरून त्याला पटली आहे हे पाहून मला किती समाधान वाटलं !

  

## ९ : : : : : : उल्का

उल्कापात होणं हे अशुभनिदर्शक समजतात, राजावर अगर देशावर काही सङ्कट यायचं असेल तर म्हणे उल्कापात होतो. मी विचारते, अशुभ का मानायचं त्याना? आपलं उज्ज्वल तेज नि सुखाचं अमर स्थान सोडून मानवाना भविष्यकाळाचा मार्ग दाखविण्यासाठी आत्मयज्ञ करतात त्या! भावी सङ्कटाची सूचना देण्यासाठी आपली अनन्तकाळची शक्ति एका क्षणासाठी एकवटून सङ्कटाच्या मार्गावरील जळत्या ज्योति होतात त्या! नि त्यांना अशुभ

म्हणायचं ? बाकी जगाची प्रवृत्तीच ही की, स्वार्थत्यागी माणसांचा गौरव करायचा सोडून त्याची शक्य ती अवहेलनाच करायची! परवाच्या सत्याग्रहाच्या चळवळीत कित्येक युवकयुवतीनी आपल्या सौख्याचा सहारा बनविला. पण त्याचं चीज कुणाला ? देशाला स्वातन्त्र्य मिळविण्यासाठी टिळक, गान्धी, जवाहरसारख्या तेजस्वी तार्‍यानी अमरपदासारखं सौख्यस्थान सोडून मृत्युलोकावरील दुःखात उडी घेतली त्याच्यावरहि चिखल उडवायला कमी नाही करीत जग!

मानवी जीविताला जोपर्यन्त ध्येयाचं आकर्षण असतं तोपर्यन्त त्याला तारकेचं स्वरूप असतं! ध्येयबिन्दु जोपर्यन्त त्याला खेचत असतो तोपर्यन्त त्याची तेजस्विता! ध्येयावरची नजर जरा चळली की, उल्केचं स्वरून प्राप्त व्हायला कितीसा वेळ लागणार? मनुष्याच्या जीविताला सावरणारी अशी कित्येक आकर्षणं असतात. त्यापैकी एखादं जरी सुटलं तरी त्याचा तोल जायला वेळ लागत नाही. प्रेम, ध्येय, आशा, आकाङ्क्षा, मान, यश किती तरी गोष्टी त्याला खेचत असतात! जगात आकर्षण हा धर्म नसता तर कोण अनर्थ झाला असता! पृथ्वीचं पदार्थावर आकर्षण आहे म्हणून जग चाललय्. विश्वातल्या इतर सर्व पदार्थांना एकमेकांचं आकर्षण आहे म्हणून यन्त्राप्रमाणं जगाचे

व्यवहार चालू आहेत, नाही का? मनुष्याचं सुद्धा असंच आहे. प्रीतीचं आकर्षण असतं, स्नेहाचं आकर्षण असतं म्हणूनच जगण्यात मौज असते. नाही तर जगाच्या चार भिन्तीत निष्क्रीय, निष्प्रभ पडून राह्यचं उल्केसारखं! गडकरी म्हणतातच ना की, जगण्यात जोपर्यन्त मौज आहे तोपर्यन्तच मरण आलेलं चाङ्गलं?

आशा झाली तरी काय उल्केची बहीणच, नाही का? जोपर्यन्त ती मनाकाशात चमकत असते तोपर्यन्तच ती मनोहर दिसते, नि तिच्यात वेडा जीव गुङ्गतो. आकाशातल्या ताऱ्याप्रमाणं समुज्ज्वल दिसते ती! पण ती सफल नाही झाली की, उल्काच बनते तिची!

उल्का विशिष्ट कक्षेतून सुटताच निष्प्रभ होते. प्रथम किती तेजानं चमकत असते ती आकाशात! एखादे वेळी एकटीच क्षितिजावर असताना कित्येकांचं ती आनन्द-निधानहि होत असेल! पण स्थानच्युत होताच तिचं आयुष्य—! एक जडपाषाणाचं स्वरूप, फार फार झालं तर एखाद्या पदार्थ—सङ्ग्रहालयाच्या चार भिन्तीआड निष्क्रिय पडून राह्यचं. पण थोडा काळ का होईना तिनं किती मोठं कार्य केलेलं असतं! असंच माणसाचंहि आहे. प्रेम, आशा ह्याची आकर्षणं जरी दैवानं तुटली तरी थोडा वेळ का होईना मनुष्यानं त्याच्या बळावर काही तरी उज्ज्वल केलेलं

असतं. त्याच्या भग्न आठवणीत मग्न होतं त्याचं मन! त्या आठवणीच भावी आयुष्य कण्ठायचा धीर देतात ना?

स्त्रिया तरी काय उल्केसारख्याच नाहीत का? जन्मभर कक्षेच्याबाहेर पाऊल नाही पडायचं नि चुकून यदाकदाचित् पडलं तर–तर काय? उल्केसारखं शेवटी निष्प्रभ होऊन जायचं. पतीच्या जीवन–मार्गावर मार्गदर्शक ताऱ्याप्रमाणं कार्य करणाऱ्या स्त्रिया वाकडं पाऊल पडताच मार्गातील धोण्ड होऊन बसतात! 'स्त्री ही क्षणाची पत्नी पण अनन्त काळची माता असते.' पत्नी म्हणून आयुष्यपटावर फार थोडा वेळ तिचं कार्य असतं पण वेळ येताच माता म्हणून आत्मयज्ञ करायला ती कधीच चुकत नाही!

  

## १० : : : : : निरगाठ

शेजारच्या घरात लग्नाचा समारम्भ धडाक्यानं चालू होता. मी माडीवर गॅलरीत इझीचेअरवर पुस्तक वाचीत पडले होते. नुकतीच वरात मिरवून आली होती. माण्डव-घरात चिकार गर्दी झालेली! दिव्यांचा लखलखाट दिसत होता. मङ्गल वाद्यांच्या कडकडाटात व स्त्रियांच्या कलकलाटात माझं पुस्तक-वाचनात लक्षच लागेना मुळी! तरी पण पुस्तकात डोकं खुपसून बसलेच होते मी! 'वधूवराची गाठ सोडा बाई कुणीतरी!' माण्डवघरात

कोणी तरी उद्गारलं. माझ्या कानात तप्त सळईसारखे ते शद्ब शिरले. पुस्तकावरून माझं लक्ष अजीबात उडालं नि नवीन विचारचक्र सुरू झालं—

वधूवराची आता तर चाङ्गली निरगाठ बसलेली नि ती आताच–वरातीहून आल्याबरोबर–उकलायची ! एका भेसूर कल्पनेनं माझं काळीज थरारलं. खरंच, मानवी जीवनातील अनन्त गाठीतील लग्नगाठ ही निरगाठ असावी, की सुरगाठ असावी ? मला तर वाटतं, की विवाह, अपत्य, मित्र या मनुष्याच्या आयुष्याशी निगडित असलेल्या निरगाठी आहेत. प्रयत्न करूनहि त्या सुटत नाहीत. विवाह ही तर अशी निरगाठ आहे, की आयुष्याची दोरीच तिथं तोडावयाला हवी, नाही तर कायमचं दुःख तरी सहन करावयाला हवं !

मनुष्याचं जीवित हे अशा अनेक निरगाठीनी बान्धलेलं आहे. त्यातील कित्येक गुन्तागुन्तीचे धागे काही केल्या उकलत नाहीत. एक गाठ सोडवायला जावं तो दुसरी बसते. रेशमाची गुन्तलेली गुण्डी असते, तिचा उकला करावयाला जावं तो तिची जास्त जास्तच गुन्तागुन्त होते. मानवी जीविताची तीच अवस्था नाही का ? अनेक तऱ्हेच्या प्रश्नचिन्हांच्या, सुखदुःखांच्या गाठीनी बान्धलेला धागा एकाच ठिकाणी गुरफटला जातो व त्याच्याविषयी

विचार करताना मन गोन्धळून जातं! राग, प्रेम, लोभ, असूया इत्यादि विकारांच्या निरगाठी नाही कधी सुटत! क्वचित्प्रसङ्गी रागाची वा लोभाची गाठ उकलता येईल पण प्रेमाची नाजुक रेशमी गाठ उकलता येत नाही–तोडण्याचंहि धैर्य होत नाही जिवाला!

विश्व हे सुद्धा अशाच निरगाठीचं बनलं आहे, नाही का? निसर्गाने मारलेल्या निरगाठी अज्ञात स्थितीत कित्येक वर्षे असून त्यांचा उकला अजून होत नाही. पृथ्वीला स्वतःच्या मगरमिठीत बद्ध करून, क्षितिज अनन्तकाळ बसलं आहे. ते नाही कधी तिला सोडीत! ग्रहगोलांच्या कक्षा एकमेकात गुन्तून गेल्या आहेत. प्रयत्न करूनही त्यापासून त्यानाही नाही कधी मुक्ति मिळत! विद्युल्लतेने मेघाला घातलेली गवसणी अनादि कालापासून अनन्तकाळपर्यन्त चालत राहणार! सारं विश्व हे असं निरगाठीनी बद्ध करून टाकलं आहे. सुरगाठ कुठंच नाही! एकाच साखळीत बद्ध झालेले जीव!

आशा-निराशा, यशापयश, श्रीमन्ती-दारिद्र्य या परस्परविरोधी दोन टोकाच्या बान्धलेल्या निरगाठी उकलताना दुबळ्या जीवांची कोण यातायात होते? दोन टोकांची रस्सीखेच सुरू झाली, की मधल्यामध्ये मानवी मनाचा मात्र चुराडा होऊन जातो. या गाठी हळुवार हातानं सोडविण्यात

जर कोणी कुशल असेल तरच त्याचा निभाव, नाही तर! नाही तर आहेच जन्माचा फास--

एखाद्या मनुष्याविषयी अकारण बसलेली अढी अगर एखाद्याविषयी वाटणारा प्रेमभाव निरगाठीच नाहीत का? कितीहि प्रयत्न केला तरी मनात असलेला एखाद्या माणसाविषयीचा तिरस्कार कमी होत नाही; अगर एखाद्याविषयी अकारण वाटणारा प्रेमभाव तुटत नाही!

मानवी जीविताच्या जाळ्याची शेवटची गाठ म्हणजे मृत्यु! या निरगाठीचा उकला करण्यासाठी किती तरी वेदान्त्यानी आपले मेन्दु शिणवले आहेत. जीविताशी मारलेली ही कालाची शेवटची गाठ आजपर्यन्त अज्ञात राहिली आहे. पुढंमागं उकलता येईल की नाही कोण जाणे!

सुखदु:खांच्या अनेक स्मृतीनी मारलेल्या या गाठी हळुवारपणे उकलत राहणं हेच मनुष्याचं कर्तव्य आहे.! त्रागा करून दैवाशी हुजत घालीत बसण्यात तिचा पीळ अधिक होतो. म्हणून जीविताच्या जाळ्याचे जाचक बन्ध उत्साहानं, हळुवार हातानं उकलण्याचा सतत यत्न करणं हेच खरं संसाराचं सार, नाही का?

  

## ११ : : : : : चान्द्रात

पूर्णिमा होती त्या दिवशी ! नील सरोवरातील पूर्ण विकसित अशा एकच एक कमलाप्रमाणं नीलाकाशातील चन्द्र दिसत होता. त्याच्या धवल सुधाधारामध्ये रजनीचं स्वत्व लोपलं होतं. जीवन-कलहानं त्रस्त झालेले जीव निद्रामातेच्या पदराखाली विश्रान्तिसुख अनुभवीत होते. मी गच्चीवरून कौमुदीच्या प्रकाशात गन्धर्व नगरीचं नीरव सौन्दर्य अवलोकन करीत होते ! समोरच्या घरातून लहान बालकाच्या रडण्याचे सूर माझ्या कानी पडल्यानं माझ्या

निस्तब्धतेचा भङ्ग झाला! कशावरून तरी ते मुल रडू लागलं होतं आणि त्याची आई नानातऱ्हेनं त्याची समजूत करण्याचा प्रयत्न करीत होती. घर जवळ असल्यानं शब्दन् शब्द मला ऐकू येत होता. किती तरी प्रकारची खेळणी तिनं त्याला दिली, पण ते काही रडायचं थाम्बेना. अखेर ती त्याला बाहेर घेऊन आली, अन त्याला चन्द्र दाखवू लागली, झालं! चन्द्र पाहताक्षणीच त्या मुलाचं रडणं हळू हळू थाम्बून त्याच्या कोमल मुखावर स्मितरेषा चमकू लागल्या!

आपल्या नेहमीच्या पाहण्यातील दृश्य आहे हे! पण हे दृश्य लहान मुलावर सुद्धा चन्द्राची किती मोहिनी आहे याचं निदर्शकच नाही का? मला वाटतं जगामध्ये चान्दरात अप्रिय असेल असा माणूस क्वचित्‌च सापडेल! अबाल-वृद्धाना चन्द्र सारखाच प्रिय असतो. चन्द्रोदय झाला की, बालगोपाल 'चान्दोबा चान्दोबा भागलास का?' म्हणून प्रेमळ प्रश्न विचारू लागतात. तरुण-तरुणीना तर चान्दरात ही एक गोड पर्वणीच वाटते. चान्दण्यात वृद्धाना शिळोप्याच्या गप्पाना बहर येतो एवढंच कशाला पाहिजे! चन्द्रदर्शनानं सागराचं हृदय सुद्धा हेलावून जाऊन तो त्याला आलिङ्गन देण्यासाठी लाटांचे बाहू पसरून आपलं प्रेम व्यक्त करतो. चन्द्र जगाला इतका प्रिय होण्याचं कारण त्याचं सुहास्य-

वदनच असावं असं मला वाटतं! सुहास्यवदनी माणसाची-सुद्धा अशीच गोष्ट आहे. ते माणूस जिथं जाईल तिथं आनन्द निर्माण झाला पाहिजे. पुराणान्तरी शङ्करानी विषशमनार्थ मस्तकावर चन्द्र धारण केला असा कथा भाग आहे. या कथेतील अतिशयोक्तिचा भाग सोडून दिला तरी असे दिसून येईल की, त्यात बराच तथ्यांश असावा. मानसिक ताप हरण करण्याची शक्ति थोड्याफार अंशानं चन्द्राच्या ठिकाणी खास आहे. विरही जनांचा ताप वाढविणारा चन्द्र आहे ही गोष्ट दृष्टिआड करून भागणार नाही! तरी पण त्यानाहि इष्ट मुखचन्द्राचं दर्शन झालं की अपूर्व आनन्द होतो हें विसरून चालणार नाहीच.

चान्दरातीच्या उलट परिस्थिति दिवसाची! सृष्टीचं सत्य पण कटुस्वरूप दिवस दाखवितो तर चान्दरात आपल्या कौमुदीच्या जादूनं रम्य वातावरण निर्माण करते! सूर्याच्या किरणात पित्याची कर्तव्यकठोरता वाटते, तर चन्द्राच्या शीतल किरणात मातेच्या स्निग्ध व स्नेहमयी कटाक्षांची आर्द्रता भासते! एकाचं कार्य प्राणीमात्राला कार्यप्रवण करण्याचे तर दुसऱ्याचं मातेच्या प्रेमळ परिचर्येप्रमाणं आपल्या सहस्र सुधामयी किरणानी सृष्टीला जोजवून झोपविण्याचं!

खाण्डेकरानी चित्रकाराला सूर्य गुरु करण्याची

ज्याप्रमाणं सल्ला दिली त्याप्रमाणं मला जर कुणा कवीनं विचारलं तर मी चन्द्राकडे बोट दाखवीन. शान्त निःशब्द वातावरण ! चन्द्र तारकांचा निर्व्याज लपण्डाव ! सृष्टीचं रम्य अन् उदात्त स्वरूप ! चान्दरातीसारखी निरनिराळया कल्पना उत्स्फूर्त होण्याला दुसरी अनुकूल वेळ नसेल. बालकवीना तर पूर्णिमेची रात्र एक अपूर्व उत्सवच वाटत असे !

सृष्टीतील सुखदुःखं नजरेआड करून आकाशाच्या निर्मळ स्वरूपाशी तादात्म्य पावण्याचं एक सहजलभ्य साधन म्हणजे चान्दरात ! साऱ्या सृष्टीची ती प्रेमळ माता ! तिच्या ठिकाणी आपपरभाव नाही आढळायचा ! सर्वांच्या दुःखाचा विसर पाडण्याची अगर त्याना आनन्दित करण्याची तिच्यात शक्ति आहे पण तिकडं कितीजणांचं लक्ष जातं ? अतिपरिचयामुळं कित्येक सुन्दर गोष्टीतील सौन्दर्य मनुष्याला जाणवत नाही. चान्दरात ही एक त्यापैकीच गोष्ट आहे. पण मला मात्र चान्दरातीच्या वेळेस—

**“ चान्दरात पसरिते पांढरी माया धरणीवरी**
**लागली ओढ कशी अन्तरी ! ”**

या काणेकरांच्या ओळीची सार्थता पटते नि त्या ओळी फिरून फिरून गुणगुणाव्याशा वाटतात.

  

## १२ : : : : नियतकालिके

एकदा एका प्रसिद्ध इङ्ग्लिश गृहस्थास हल्लीच्या सुधारलेल्या जगातील अत्यन्त परिणामकारक गोष्ट साङ्गा असे कोणी विचारल्यावरून त्याने पुढील उत्तर दिले:– Neither the machine-gun nor the aeroplane but the Newspaper !

केवढं अचाट सामर्थ्य आहे नियतकालिकामध्ये हे ! की, ज्यापुढं मशिनगन् अथवा विमानं ही कमजोर ठरावी ! आरबी किंवा काठियावाडी घोडे नाचवायचे दिवस गेले

आणि कागदी घोडे त्याऐवजी आले ! पण किती अपार सामर्थ्य आहे या कागदी घोड्यात ? पूर्वी युद्धाला निघालेल्या वीराना स्फुरण आणण्यासाठी रणभेरीचा स्फूर्तिदायक नाद पाहिजे असे, पण हल्लीच्या या नादहीन कागदी रणभेरी सबन्ध जग हलवून सोडतात !

ग्रन्थ हे मनुष्याचे गुरु होत, पण मला वाटतं हल्ली नियतकालिकंच मनुष्याचे खरे गुरु होत. सबन्ध जगातील वर्तमानकालच्या घडामोडीचं ज्ञान घरबसल्या करून देण्याची ताकद आहे कुणा गुरूला ? वर्तमानपत्र हा कालाचा आरसा आहे. कालाचं बदलणारं प्रतिबिम्ब या आरशात पहायला मिळतं ! ब्रिटिश विश्वकोशानं इतिहासाचं केलेलं लक्षण थोड्याफार अंशानं नियतकालिकांनाहि बरोबर लागू पडतं. त्या दृष्टीनं 'Newspaper enters into every phase of activity and the economic forces which urge society along are so much its subject as the political result' असं म्हटलं तर फारसं चुकीचं होणार नाही. नियतकालिकाचं क्षेत्र एवढं अफाट आहे, की त्याची कल्पना सामान्यास होणं शक्य नाही. क्षेत्राप्रमाणंच त्याचं सामर्थ्यहि अपार आहे. लेखणी तरवारीपेक्षा श्रेष्ठ आहे म्हणतात ते उगीच नाही ! प्रत्यक्ष पार्लमेन्ट व राजा याना नामोहरम करण्याचं सामर्थ्य

विल्क्सला आलं ते वर्तमानपत्राच्या साहाय्यानंच. आधुनिक युगात वर्तमानपत्रं हे एक तेजस्वी व प्रभावशाली हत्यार आहे. सध्याच्या युगाला लोक कलियुग म्हणतात; पण त्याला 'वर्तमानपत्रयुग' म्हटलं तर अधिक युक्त दिसेल असं आपलं मला वाटतं हं! कारण कलीच्या साम्राज्यात जितके अन्याय होत नसतील तितके अन्याय या वर्तमानपत्री युगात बघायला सापडतात. कळ लावण्याच्या बाबतीत तर कलीसुद्धा वर्तमानपत्राचा हात धरू शकत नाही. कलीनं कळ लावली तरी शेवटी सत्याचा पक्ष विजयी ठरतो असा सङ्केत तरी तिथं आढळतो; पण वृत्तपत्रांच्या बाबतीत सत्य नेहमी विजयीच ठरतं असं ठाम साङ्गता येणार नाही!

वृत्तपत्रांची करामत एवढी दाण्डगी असते, की कधी कधी सृष्टिनिर्मितीबद्दल ब्रह्मदेवालासुद्धा लाजेनं मान खाली घालावी लागेल! वृत्तपत्रांच्या कारखान्यातून काय निर्माण होणार नाही? सहारा वाळवण्टात मयसभाहि लीलेनं उत्पन्न होईल! एखाद्या पुण्यवान् स्त्रीला अनेक पूर्वजन्मांची स्मृति होईल! मानवाचं रूपान्तर सुसरीत होईल! पञ्चमुखी मारुतीला पापातिरेक सहन न होऊन घामहि फुटूं लागेल! एकाच वेळी दहा पुत्र प्रसवून कुणा स्त्रीचा कुसवा धन्य झालेला आढळून येईल! शेपूट नि शिङ्गं असलेली माणसंहि यातून निर्माण होतात. असत्याचं

नसतं व नसत्याचं असतं हा तर तिथला नेहमीचाच खेळ आहे. किती साङ्गावा या वर्तमानपत्रांचा महिमा! अद्भुत रम्यतेच्या बाबतीत अरेबियन नाइटसुद्धा लाजेल बरं वर्तमानपत्राला! वर पुन: Truth is stranger than fiction म्हणून एक्स्ट्रॉ स्ट्रॉङ्गची गोळी द्यायला ते कमी नाही करणार!

असं जरी आहे तरी हा सर्वस्वी वर्तमानपत्राचाच दोष आहे असं मला म्हणायचं नाही. इथं 'योजकः तत्र दुर्लभः' असंच म्हणण्याची पाळी येते. अस्थिर जलपृष्ठावर प्रतिबिम्ब वेडंवाकडंच उमटणार! तो दोष वस्तूचा नसून जलपृष्ठाचा आहे. एकच ठिणगी घराला आग लावू शकते, पण तीच योग्य ठिकाणी उपयोजिली तर मार्गदर्शक ज्योत निर्माण करू शकते. फरक काय तो योजकतेचाच! वर्तमानपत्राचीसुद्धा हीच स्थिति आहे. ती राष्ट्राच्या प्रगतीला नि योग्य व जोराची गति देऊ शकतात. अधोगतीच्या वेळी ब्रेकसारखा त्यांचा उपयोग होतो. राष्ट्राच्या प्रगतीला धक्का न देता धोक्याच्या वेळी बचाव करण्याचा प्रयत्न वर्तमानपत्रंच करू शकतात यात शङ्का नाही!

## १३ : : : : : स्वार्थत्याग

किती आवेशानं बोलत होते जहागिरदार त्या दिवशी! साऱ्या शेतकऱ्यांच्या नेत्रात कौतुक नि आश्चर्य चमकत होतं. "तुम्ही माझ्या मुलासारखे आहात. बाबानो, प्रजा सुखी तर राजा सुखी! तुमच्या सुखाकरता आम्ही हा स्वार्थत्याग करीत आहोत. आम्ही देशी जिन्नस वापरतो ते केवळ तुम्हाला पोटाला उद्योग मिळावा म्हणून. आज तुमच्यासाठी आम्ही आमच्या खाजगीतून ५०००० रुपये देणगी देत आहोत ती तुमच्या कल्याणासाठीच.

लक्षात ठेवा! आम्ही केव्हांहि तुमच्यासाठी प्राण देण्यास एका पायावर तयार आहोत." टाळ्यांचा प्रचण्ड कडकडाट झाला. जहागिरदारसाहेब मखमली सोन्याच्या खुर्चीवर मोठ्या ऐटीनं विराजमान झाले. गळ्यात उञ्ची हार पडले आणि थोड्याच वेळात त्यांची स्वारी रोल्सराईसमधून गरिबावर धूळ उडवीत दिमाखानं निघून गेली.

"मोठा माणूस बरं!" एकजण घरी जाता जाता उद्गारला.

"एवढा श्रीमन्त जहागिरदार पण देशी कापड वापरतो काय! शेतकऱ्यात येऊन मिसळतो काय! आमच्यासाठी प्राणहि देण्यास तयार आहे. देव त्याचं भलं करो." दुसरा बोलला.

"असला स्वार्थत्यागी महात्मा माझ्या पाहण्यात नाही." तिसऱ्यानं पुस्ती दिली.

मी घरी जात असता माझ्या कानावर पडत होता हा संवाद. स्वार्थत्याग! भव्य नि उदात्त दिसणाऱ्या ह्या त्यागाचं स्वरूप किती हीन होतं हे साऱ्या जगाला माहीत होतं, पण बोलायचं कुणी? हे ५० हजार रुपये कित्येक दीनदुबळ्यांच्या माना मुरगाळून घेतले गेले असतील! किती गरिबांचे तळतळाट माथी बसले असतील! हा कसला स्वार्थत्याग! कुत्र्यांची नि घोड्यांची धन करून वर स्वार्थ-

त्यागाचा दिमाख ! लोकाकडूनच उकळलेले पैसे लोकांच्या डोळ्यात भरतील अशा तऱ्हेनं पेरून शाब्दिक अवडम्बरानं वजन मारण्याचाच हा प्रकार! त्यागाच्या हिरवळीखाली स्वार्थांचे जिवाणू टीप धरून बसलेले? त्यांच्या स्वार्थ-त्यागाची फुलं सदैव फुलण्यासाठी शेतकऱ्यांच्या रक्ताचं खत सतत कसं पडत राहील या बाबतीत हे त्यागी मोठे दक्ष असतात. मला वाटतं यांचा स्वार्थत्याग हा शब्द म्हणजे जणू काही गगनारविन्दच! सामान्यजनांची तो मृगजला-सारखीच फसवणूक करतो.

श्रीमन्तांच्या स्वार्थत्यागावरून तरुणांच्या स्वार्थत्यागा-कडे वळलं तर माझं मलाच खूप हसू येतं. नुकतीच एक गम्मत झाली. मी माझ्या एका मैत्रिणीकडे गेले होते. माझ्या पुढूनच आमच्याच कॉलेजमधला एक हाडकुळा तरुण अगदी आम्बट तोण्ड करून निघून गेला. मी माझ्या मैत्रिणीला विचारलं, "काय झालं ग त्याचं?" ती अगदी फुसफुसत म्हणाली, "भली जिरली स्वारीची! मला म्हणतो, 'माझं तुझ्यावर प्रेम आहे. तुमच्यासाठी वाटेल तो स्वार्थ-त्याग करण्याची तयारी आहे माझी.' मी म्हटलं, 'इतकं जर तुमचं माझ्यावर प्रेम आहे, तर मी सुखी व्हावं असं तुम्हाला वाटणारच, नाही का?' तो म्हणाला, 'अर्थात्.' मी म्हटलं, 'मग माझ्यासाठी एवढा स्वार्थत्याग करा, की

माझ्यावर प्रेम करणं सोडून द्या.' अगदी खेटरं मारल्या-सारखं तोण्ड करून निघून गेला लोचट मेला!'

माझी हसता हसता पुरेवाट झाली! पण ही गोष्ट खरी नाही का? विकाराच्या आधीन होऊन स्वार्थत्यागाच्या माऽरे गप्पा मारायऱ्या, अन् शेवटी काय तर पश्चाताप! परवाऱ्याच चळवळीमध्ये कित्येक मुलानी शाळा–कॉलेजं सोडून सत्याग्रहाचा मार्ग स्वीकारला. असं करण्यात त्यांच्या भावना उदात्त होत्या कबूल; पण खम्बीर विचाराचं पाठबळ नसल्यामुळं आता हेहि गेलं नि तेहि गेलं अशी पाळी आली आहे त्यांपैकी कित्येकजणाना. म्हणजे स्वार्थत्याग करू नये असा अर्थ नाही हं! पण तो करताना विकारा-पेक्षा विचाराना प्राधान्य दिलं पाहिजे. विकाराला बळी पडून किंवा क्षणैक मोठेपणाला भाळून केलेला स्वार्थत्याग कितीहि उच्च दर्जाचा भासला तरी तो शेवटी आततायी-पणाचाच ठरेल. जगातील प्रत्येक परमाणु give and take या धर्माचा आहे. प्रत्येक मनुष्य दुसऱ्याकरिता काही तरी करीत असतो; पण त्या त्यागाऱ्या मोबदल्यात दुसऱ्या कोणत्या तरी अधिक मौल्यवान् वस्तूंची तो अपेक्षा करीत असतो. 'नवाऽरे कस्यापि कामाय कोऽपि प्रियो भवति आत्मनस्तु कामाय कोऽपि प्रियो भवति' हेच तत्त्व शाश्वत सत्य आहे. भगवान् बुद्धानं सर्व ऐहिक वैभवाचा त्याग

करून अतोनात कष्ट सोसले. कशासाठी ? शाश्वत समाधाना-साठीच ना? त्यागाची अमोल किम्मत देऊन त्यानं आत्मिक सौख्य साधण्याचाच प्रयत्न केला ना? आई-बापांच्या स्वार्थत्यागाची तुलना कशानंच होणार नाही; पण त्यातहि त्यांच्या हृदयाला लाभणाऱ्या अलौकिक उच्च स्वार्थातच त्यांच्या त्यागाचं बीज आढळून येतं. सर्व सृष्टि याच भावनेवर उभारली नाही का? सागर उदारपणानं मेघाना स्वतःचं जल देतो; पण त्यामुळच अनन्त सरितांच्या आलिङ्गनाचं मादक सौख्य त्याला अनुभवावयास सापडतं. एकूण काय, प्रत्येक प्राणिमात्र स्वसुखासाठी धडपडत असतो. आणि त्या सुखाच्या धडपडीमध्ये जो त्याच्याकडून त्याग होतो त्यामुळंच इतराना सौख्य लाभतं.

  

## १४ : : : : : : मूक

'सम्मेलनाच्या निमित्तानं या खेपेस तू बडोद्याला यायलाच पाहिजेस,' असं चित्राताईचं पत्र आलं होतं, नि आणखी किती तरी गोड गोड लिहिलं होतं तिनं! माझ्या मनानं बडोद्याला जायच घेतलं, साहित्यिकांचा मेळावा पहिल्यान्दाच मला पाहायला मिळणार या आनन्दात माझं हृदय नाचत होतं! हो, का आनन्द वाटणार नाही मला? खाण्डेकर, माधवराव पटवर्धन—माझे गुरुजी ते—यांच्यासारख्या साहित्यिकांची भाषणं; मायदेव, ठोकळ,

चौधरी, बोरकर, या कवींची गोड काव्यगायनं; नि त्यातून अश्लीलतेवरील ठराव गाजणार म्हणून ऐकलेलं; या सर्व गोष्टी चित्रेन पत्रातून कळविल्यामुळं, बडोद्याला जाण्यास माझं मन भुकेलं होतं. बाबांची परवानगी मिळावयाला अगोदर त्रास पडला ? हमले, रुसले अन् शेवटी मुसमुसले सुद्धा तेव्हां दिली त्यानी परवानगी, नि बडोद्याला जाण्याकरिता रेल्वेच्या डब्यात पाय ठेवला.

भक्! भक्! भक्! आवाज काढीत गाडी धावत होती. भूक लागली की कोळसा खावा, तहान लागली की पाणी प्यावं! तिचा अखण्ड प्रवास चालू होता. अनन्त जीवांची ये जा चालू होती. पण तिला काय त्याचं ? कधी कण्टाळा म्हणून नाही! पण तिच्या चालीत उत्साह नव्हता आढळत. तिच्या गतीत द्रुतता असली तरी मधुरता खास नव्हती. भक्, भक्, भक्, खा कोळसा नि पी पाणी !

मी खिडकीतून शून्य दृष्टीने पहात होते. माझ्या विचाराची गाडी केव्हांच बडोद्यास पोचली होती ! माझे मन साहित्यसम्मेलनाची चित्रं रेखाटण्यात तल्लीन झालं होतं. कल्पना मनाची भूक शमवीत होती. सातार-रोडवर गाडी थाम्बली. एक वृद्ध गृहस्थ व एक तरुण स्त्री गाडीत —मी बसलेल्या डब्यातच—चढली. मला प्रथम वाटलं की गरजू बाप मुलीला दाखवायाला चालला आहे कुठेसा ! ती

दोघेहि माझ्यासमोर बाकावर येऊन बसली. त्या मुलीच्या नेत्रात असहाय्य मादकता चमकत होती. हाडापेरानं बळकट उफाड्याची पोर! तिच्या गळ्याकडं लक्ष जाताच मी दचकले. 'एकूण हिचं लग्न झालं आहे तर?' मी मनाशीच पुटपुटले. ती तरुणी माझ्याजवळ हळूच सरकली आणि अल्पकाळातच आम्ही दोघी गुजगोष्टी करू लागलो.

तो वृद्ध गृहस्थ तिच्या कुङ्कवाचा धनी, अग्निब्राह्मणासमक्ष शपथ घेतलेला तिचा पति होता. त्याच्या अर्ध्या अधिक गोवऱ्या स्मशानात गेल्या होत्या. चवथी पत्नि होती ती त्याची! त्याला सन्ततीची भूक लागून राहिली होती. आपलं नाव पुढं चालावं म्हणून पुष्कळ पैसा देऊन तिला त्यानं विकतच घेतली होती. तिच्यापासून तो सन्ततीची इच्छा करीत होता पण केवळ इच्छा ही वन्ध्या स्त्रीसारखीच असते, नाही का? तिच्या हृदयाची भूक मात्र अतृप्तच राहिली होती! तिनं हृदयात पूजिलेल्या तिच्या वल्लभाला ती कायमची अन्तरली होती. त्या दोघांच्या हृदयाना भुकांची आग जाळीत होती. पण किती भिन्न प्रकारच्या भुका होत्या त्या! माझ्या फुलत्या वृत्ति उदास झाल्या, माझ्या मनाची भूक कुठल्या कुठे नाहीशी झाली! पुण्याला ती दोघं उतरली. मीहि गाडी बदलली माझ्या मस्तकावरचे ओझे उतरल्याचा मला भास झाला.

मला जरा हायसे वाटले !

गाडीनं पुणं सोडलं. आगगाडीतलं ते चित्रविचीत्र जग अवलोकन करून माझ्या मनाची करमणूक करून घेण्याचा मी प्रयत्न करीत होते ! गाडी बदलली तरी आतील जीवन कुठं बदललं होतं ? मला वाटलं सारेच जीव कुठल्या ना कुठल्या भुकेनं तडफडत आहेत. कुणाला पैसा हवा असेल, तर कुणाला अधिकार, कुणाला सन्तती, कुणाला प्रेम, कुणाला कीर्ति, कुणाला मोक्ष, प्रत्येकाला काही ना काही भूक लागली असेल ! प्रत्येकाला आपली भूक इतर सर्व भुकाहून महत्वाची वाटत असेल, मला नव्हती का बडोद्यास साहित्यसम्मेलनास जाऊन मनाची भूक शमवायाची भूक लागली होती ?

दोन बाकांच्या मधल्या वाटेत एक तरुण स्त्री अधोमुख करून बसली होती. तिच्या माण्डीवर बसलेली पोर खाली पडलेल्या सन्त्र्याची साल चोखत होती. मला कसंसच वाटलं ! शेवटी त्या सालीनं तिचं पोट भागेना म्हणून ती पोर रडू लागली. त्या तरुण मातेनं आपली केविलवाणी नजर सभोवर फिरविली. माझ्या नजरेला तिची नजर भिडली. माझ्या हृदयातून करुण लहरी उसळल्या ! 'माझ्याकरिता नसलं तरी पोटच्या गोळ्याकरिता तरी काही अन्न द्या' असेच जणू तिचे भुकेलेले डोळे लाचार

होऊन याचना करीत होते. तिची नजर माझं हृदय कापीत गेली. माझ्या नेत्रात अश्रूंनी गर्दी केली. आसवं टिपण्यासाठी मी तोण्ड वळविलं अन् उदास मनानं बाहेर पाहिलं. धावत्या माळावर गुरं निश्चित मनानं चरत होती. गुरानासुद्धा हिरवा गार चारा खायला मिळावा नि हिच्यासारख्या हाडामासाच्या स्त्रीला खायला अन्नाचा कणहि नसावा! कुणी केलं हिला भुकेकङ्गाल? किती तरी विचार माझ्या मस्तकात उसळू लागले! बॅगमधून माझा खाण्याचा डबा काढून मी तिच्या फाटक्या पदरात मोकळा केला. माझ्या मागच्या बाकावरील एक तरुण कुठल्याशा पुस्तकातील एक वाक्य दुसऱ्याला वाचून दाखवीत होता—

"There was at the top of all, hunger (eldest, strongest of passions) predominant breaking down the stony fences of shame and awkwardness, and a troubling over-consciousness."

पोटासाठी किती लाचार व्हावं लागतं माणसाला! नाही का? पण याची आहे का कुणाला चाड? सामान्य जनता नसली तरी बुद्धिवान् साहित्यक! कोट्यावधि दलितांच्या पोटांची भूक शमविण्यासाठी कोण बरं यत्न करणार? बड्या बड्या साहित्यिकानी व त्यांचं अनुकरण

करणाऱ्या विद्यालयातील तरुणतरुणींनी उठल्या सुटल्या शारीरिक भुकेची उन्मादक वर्णनं करावीत, स्त्रीपुरुषांच्या परस्पर अनिवार्य आकर्षणाची भडक चित्रं रङ्गवावीत, फ्राइड महर्षींचा आधार घेऊन सदान्‌कदा शारीरिक भुकेची मीमांसा करावी, पण त्याचबरोबर पोटाच्या भुकेची मात्र उपेक्षा करावी! शारीरिक भुकेवाचून मनुष्य जगू शकेल, पण पोटाची भूक! पोटाची भूक शमली तर तिला उदात्त संस्कृतीची गोड फळं येतात. पण पोटाची आग भडकली तर त्यात ती संस्कृति नि महान् साम्राज्यं जळून खाक होतात!

साहित्यिक! काय जादू आहे या शब्दात? झोलाच्या लेखणीपुढे फ्रेञ्च सरकार गडबडले. व्हॉल्टेअरच्या लेखणीस सारा युरोप थरथर कापत होता. मॅक्झिम गॉर्कीच्या लेखणीने केवढे प्रचण्ड कार्य केले! आणि आमचे मराठी साहित्यिक स्वतःच्या पोटाची भूक भागविण्याकरिता व पाण्ढरपेशा वाचकाना खूष करण्याकरिता पाण्ढऱ्यावर काळं करताना आपल्या सद्सद्विवेकबुद्धीच्या तोण्डाला काळं फासण्यास ते मुळीच कचरत नाहीत. स्वतःची भूक शमविताना अनन्त दलितांच्या भुकेचं शमन करण्यासाठी त्यांच्या लेखण्या नाही कुठे झिजत?

आजच्या साहित्यिकात कुणाला प्रेमाची भूक लागते

तर कुणाला कीर्तीची असते. प्रत्येकाची भूक वेगळी. प्रेम, काम, श्लील, अश्लील, संस्कृति संरक्षण, कला आणि नीति धर्म, एक ना दोन अनेक भुकांची मीमांसा करताना शेकडो वागीश्वर आपल्या झरण्या रिकाम्या करतात, पण सर्व भुकेहून अत्यन्त विराट अशी पोटाची भूक...!

गाडीनं कर्कश किंकाळी फोडली. मी दचकून शुद्धीवर आले. "कशासाठी, पोटासाठी" असं ओरडत गाडी घाटातून चालली होती!

  

## १५ : : : : पोरकटपणा

अजून आठवतो तो दिवस! श्रावणातील सरता सोमवार होता. आम्ही साऱ्या मुलींनी कार्तिकस्वामीला जायचा बेत केला. आम्ही साऱ्या मुली! दहा मैल चालून जायचं नि तसंच परत यायचं. वाटेत दोन डोङ्गर ओलाण्डायचे. पण सर्वांनी हुरूप धरल्यानं बेत नक्की झाला. हो, मोकळया वातावरणात स्वच्छन्दानं बागडायला एक दिवस मिळाला तर त्याकरता वाटेल ते श्रम करण्यास आम्ही तयारच असतो. त्यातून आम्ही पडलो मुली.

आम्हाला आनन्द का वाटणार नाही ?

पहाटे पाचला आम्ही गाव सोडला. आमच्यावर देखरेखीसाठी तरी पण एक बाई होत्याच बरोबर. साऱ्या पोरी आम्ही मग पोरकटपणाला ऊत आल्यास नवल नाही. पहिला डोङ्गर चढू लागलो तो पाऊस सुरू झाला. एका ओढ्यात प्रथम ताई घसरून पडली. आम्हाला हसता हसता पुरेवाट झाली. ताईचं पातळ भिजलं. किती तरी मुली मजेखातर मुद्दाम घसरून पडू लागल्या. बाईशिवाय साऱ्या मुलींनी छत्र्या मिटविल्या होत्या. बाई मात्र एकट्या छत्री उघडून दिमाखानं शिष्टासारख्या एका बाजूनं काळजी-पूर्वक पावलं उचलीत होत्या. आम्हा मुलींच्या मुखावरून तिरस्काराची लहर चमकून गेली. कार्तिकस्वामीच्या मन्दिरा-जवळ धबधब्याखाली आम्ही पावसातच जेवलो. दुपारी खेळ खेळलो. खूप हुदडलो. सायङ्काळी परतलो. परत येताना परत पावसानं झोडपलं. पाणीच पाणी झालं होतं सगळीकडं. पाऊस आला नि अर्ध्या तासानं उघाला. रस्त्यात जागोजाग पाणी साठलेलं. एकमेकींच्या अङ्गावर पाणी उडविण्यास आम्ही सुरुवात केली. आणि आमच्या खेळात चुकून बाईंच्या अङ्गावर पाणी उडाले. किती रागावल्या बाई ! त्यांचा तो रागावलेला चेहरा माझ्या दृष्टीपुढं अजून उभा राहिला की, अङ्गावर शहारे येतात.

' किती पोरकटपणा करशील सागरिके, एवढी घोडी झालीस, शिष्टाचार अगदीच कसा नाही मेला !'

बाईंचे हे शब्द साऱ्यांचं हृदय कापीत गेले. मी तर पाण्यातील ढेकळासारखी विरघळून गेले. आमची खेळकर वृत्ती नाहीशी झाली. साऱ्याजणी चुपचाप होऊन खाली मान घालून चालू लागलो. बाईंच्या शिष्टाचारानं आमचा आनन्द मावळून गेला, नि आमची पोरकटपणाची सफर शिष्टाचाराच्या व्याख्यानानं समाप्त झाली.

बालकाच्या निर्व्याज खेळकर वृत्तीला पोरकटपणा म्हणून नावं ठेवायची ही ढोङ्गी जगाची रीतच आहे; पण पोरकटपणा मला फार आवडतो. कारण त्यात बालकाची निर्व्याजता असते. याच्या उलट शिष्टपणात प्रौढांची 'आत एक तर बाहेर दुसरेच' अशी दुटप्पी ढोङ्गी वृत्ती असते म्हणून मला त्याचा लहानपणापासून तिटकाराच आहे. कुठल्याशा एका इङ्ग्रजी ग्रन्थकारानं शिष्टाचाराची सुरेख व्याख्या केली आहे. तो म्हणतो आपली इच्छा नसताना केवळ दुसऱ्याकरिता आपण जे आचार पाळतो त्याला शिष्टाचार म्हणावयाचे. किती बरोबर आहे ही व्याख्या, नाही का ? शिष्टाचाराच्या बन्धनाखाली प्रौढानी हवं तर आपलं जीवन चुळबुळत कण्ठावं पण तरुण-तरुणीना त्याची बन्धनं नेहमी त्रासदायक होणार. शिष्टाचारामुळं मनुष्य

जीवनातील आनन्दला पारखा होतो. नव्हे शिष्टाचार हा जीवनाच्या प्रगतीला बाधक आहे असंहि मला वाटतं.

मानवी व्यवहाराचं ज्यानं थोडसं निरीक्षण केलं आहे त्याला हे आढळून येईल की, जीवनाचा आनन्द व्यक्त होताना मानवाच्या हातून होणाऱ्या हालचाली दिसायला पोरकटच दिसतात. कुटलासा ग्रीक शास्त्रज्ञ टबमध्ये स्नान करीत होता. त्याला न सुटणाऱ्या प्रश्नाचं उत्तर त्या वेळीच सुचलं नि आनन्दाच्या भरात स्वारी तशीच उठून पळाली हे उदाहरण प्रसिद्धच आहे. मला वाटतं आनन्द नि पोरकटपणा ही आन्योन्याश्रयी आहेत. अत्यन्त आनन्द झाला असता तो व्यक्त करताना म्हातारी माणसंसुद्धा आनन्दानं टाळ्या वाजवून नाचताना आढळून येतात. आकाश मोत्यांचा वर्षाव करू लागलं म्हणजे लहान मुलाचा आनन्द नाचण्याच्या नि गाण्याच्या रूपानं व्यक्त होतो हे दृश्य आपण नेहमीच पाहतो. मला सुद्धा अशा वेळी त्यांच्यात मिसळून त्या आनन्दाचं अंशभाक् व्हावसं वाटतं, पण ही शिष्टाचाराची बन्धनं...!

सामान्य शिष्ट जनता ही नेहमी प्रतिभेचा द्वेष करते. तिला आपल्याहून उच्च genius आवडत नाही. अशा प्रतिभाशाली व्यक्तीच्या चरित्राचं अवलोकन केलं तर कधी कधी त्यांच्या आचरणात पोरकटपणा आढळून येतो.

आपणाला जो पोरकटपणा वाटतो तो त्यांच्या विचार-आचाराचा सीधेपणा असतो असं मला वाटतं! त्यांचे विचार आचरणातून उतरत असतात. शिष्टाचारासाठी काही शिष्टांना खुष करण्यासाठी ते आपल्या विचाराविरुद्ध आचरण करण्याचं पातक करीत नाहीत. विचाराशी अव्यभिचारी राहिल्यानं शिष्टांना त्यांच्या आचरणात पोरकटपणा आढळतो. तो त्यांचा दोष नाही. आपल्या दृष्टीचा आहे तो दोष!

मनाला पटलेल्या गोष्टी मोकळ्या रीतीनं व्यक्त करणं यात शिष्टाचार आड येऊ नये असं माझं प्राञ्जळ मत आहे. समाज म्हटला की, त्याला काही सामाजिक कृत्रिम बन्धनं येणार हे मी जाणते. तेवढ्यासाठी सारेच शिष्टाचार सोडून मनःपूत आचरण करावं असं माझं म्हणणं नाही. तरी पण हल्लीचे सारेच शिष्टाचार युक्त आहेत असं मात्र म्हणायला मी मुळीच तयार नाही. त्यातील बरेच शिष्टाचार ढोङ्गी आहेत म्हणूनच, लोकांनी पोरकट म्हटलं तरी चालेल पण आपल्या विचारास युक्त असंच आचरण आपल्या हातून घडलं पाहिजे यातच जीवनाचा आनन्द साठविलेला आहे असं माझं मत आहे.

  

## १६ : : : : रद्दीतील रत्ने

किती वेळ अभ्यास करीत बसले होते मी ! कण्टाळा आला शेवटी अभ्यासाचा ! बाल मन म्हणू लागलं 'फिरायला चल,' पण माझ्यापुढं अभ्यासाचा ढीग पडला होता. प्रौढ मन म्हणायला लागलं 'फिरायला जाऊन कसं भागेल ? अभ्यास नको का व्हायला ?' यावर बाल मन म्हणालं 'फिरून आल्यावर दुप्पट अभ्यास होईल तुझा.' शेवटी लहान मुलंच नाही का आपला हट्ट पुरा करीत ? तस्सं झालं माझं. फिरायला जायचं म्हणून खोलीबाहेर पडले, तोच

कल्पनाताईची मूर्ति माझ्यापुढं हसत उभी ! नि मग काय ? घरात पाहुणे आले म्हणजे लहान मुलाना हट्ट सोडून गप्प बसावं लागतं, नाही का ? तसंच माझ्या फिरायला जाऊ इच्छिणाऱ्या बालमनाचं झालं ! पण रुसलेल्या मुलाला दुसऱ्या क्षणी हसायलाहि वेळ लागत नाही ! कल्पनाताईला पाहून मनाला किती आनन्द झाला. प्रेमानं तिचा हात धरून आत कोचावर आम्ही किती तरी वेळ बोलत बसलो होतो. दिवेलागण झालेलीहि कळून आली नाही आम्हाला !

चार–पाच दिवसानी ती परगावी जाणार होती म्हणून मला भेटून जाण्याकरता आली होती ती ! सासरी जाणार होती ती ! शिक्षण घेत असता आम्ही किती बेत रचले होते. कल्पनेच्या मनोराज्यात केवढे गगनचुम्बी मनोरे उभारले होते. पण मला आता पटलं की, बायकांचं जीवन म्हणजे लतेसारखंच. लतेनं नाजुक फुलाना जन्म देऊन दश दिशाना फक्त परिमल पसरावा. रसरसलेली फळं वृक्षापासूनच लाभतात लोकाना ! कल्पना सासरी जाण्याच्या आदले दिवशी मी तिच्या घरी गेले. सामानाची आवराआवर करीत होती कल्पनाताई ! केवढा रद्दीचा ढीग पडला होता तिच्या समोर ! त्या रद्दीतील पुस्तके चाळत होती ती ! नव्या पुस्तकाबरोबरच झुरळानी व कसरीनी ताव मारलेली ही पुस्तकं त्यात आढळून येत होती. ‘ काय चाळून पहातेस

ग?' मी सहज प्रश्न केला. 'रद्दीतील रत्ने!' तिनं खण-खणीत जाब दिला. तिच्या हसऱ्या मुखावर खिन्नता पसरली. थट्टा करण्याची माझी वृत्ती कुठल्या कुठं लुप्त झाली. मीहि तिच्याबरोबर पुस्तकं उलथीपालथी करू लागले. 'किती वाजले ग?' मध्येच तिनं बावरून विचारलं, 'पाच!' मी उत्तर दिलं. 'मोटारीची वेळ झाली. मी त्यांच्या सन्ध्येची व्यवस्था करते, नाही तर पुस्तक हातात घेऊन बसलेलं त्यानी पाहिलं तर जीवच घेतील माझा!' कसं तरी वाक्य पुरं करून तिनं खोलीबाहेर पळच काढला. पुस्तकानं भर-लेल्या खोलीत मी एकटीच विचार करीत होते.

कल्पनाताईची करुणमूर्ति माझ्यापुढं उभी राहिली. ती म्हणजे समाजानं रद्दीत फेकलेलं एक रत्न नव्हतं का? किती सुन्दर! किती हुशार! किती सुरेख लिहायची नि बोलायची! पण तिच्या पदरी आज जुन्या विचाराच्या सावकाराबरोबर संसार करायचं आलं होतं! बापाचा वाढता संसार व दारिद्र्य आणि सावकाराची श्रीमन्ती या द्वन्द्वाचं पर्यवसान मुकाट्यानं लग्नास कबूली देण्यात झालं. काय कमी होतं तिच्यात? पण समाजानं असल्या रत्नाला निर्विकार चित्तानं पायदळी तुडविलंच ना?

कल्पनाताईच काय, अशी कोट्यावधि रत्नं रद्दीतच पडून रद्दीमोल होऊन जात नाहीत काय?

There's many a flower that are born
to bloom and blush unseen.

असं कुठल्याशा इङ्ग्रजी कवीनं म्हटलं आहे. पण फुलाना स्वतःच्या इच्छेप्रमाणं फुलण्याचं तरी भाग्य लाभतं! पण आमच्या समाजात फुलण्याचं भाग्य राहिलं दूर, पण त्यांना 'इच्छा करणं' हे सुद्धा महत्पाप समजलं जातं. भरतखण्डातील साऱ्या स्त्रिया म्हणजे रद्दीत पडलेली—धुळीनं माखलेली—रत्नंच नाहीत का? त्याना पैलू पाडून कोन्दणात कोण बरं बसविणार? समाजानं तशी कुठं ठेविली आहे परिस्थिति? आठ कोटी अस्पृश्यात किती तरी रत्नं असतील! पण जिथं सारा अस्पृश्य समाज आपण रद्दी म्हणून दूर फेकून दिलेला, तिथं रत्नं असली तरी आम्ही त्याना रद्दीच म्हणून सम्बोधणार! असल्या रत्नांची पारख करायला रत्नपारखीच हवा!

सतराव्या शतकात साऱ्या महाराष्ट्रभर स्वार्थाची धूळ पसरली होती. त्याखाली अनन्त रत्नं निस्तेज भासल्यानं पदोपदी लाथाडली जात होती. पण शिवाजी महाराजासारख्या रत्नपारख्यानं किती तरी रत्नाना पैलू पाडले नि कोन्दणात बसवून चमकावयाला वाव करून दिला. त्या रत्नानी साऱ्या महाराष्ट्राचा इतिहास उज्ज्वल करून सोडला.

आज रद्दी म्हणून बाजूस फेकून दिलेल्या समाजात किती तरी रत्नं असतील? रत्न काय, कुठंहि चमकून जातं असं म्हणतात; पण हा नियम रद्दीतल्या रत्नाला नाही लागू. त्या रत्नावर धुळीवर धूळ साचून शेवटी ती माती मोल होऊन जातात. हजारो वर्षांचा हा इतिहास आहे. या रत्नाना योग्य कोन्दणात बसविणारा योजक आज दुर्लभ आहे. असल्या रत्नांचे कोळसे करणारे योजकच आजकाल समाजात फार आहेत.

'उद्या सकाळी आठच्या मोटारीनं निघायचं! मला थाम्बायला सवड नाही! लक्षात आलं का?' बाहेरून कर्कश स्वरातलं बोलणं माझ्या कानावर पडलं नि मी माझ्या विचारतन्द्रीतून जागे झाले. 'आणि असली फुलपाखरी पातळं नेसलेली मला नाही खपणार यापुढं!' दुसरी सलामी झाली. माझ्या कानात ती वाक्यं तापलेल्या तेला-सारखी शिरली. पण! मी कल्पनाताईला कशी धरून ठेवू शकणार?

उद्या सकाळी एक रत्न रद्दीत जाऊन पडणार या कल्पनेनं मी व्याकूळ झाले.

  

# १७ : : : : काही चेहरे

ढगाळल्या आकाशाची पडछाया माझ्या मनात पडत होती ! मनाला रमविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला पण जमेनाच ते ! काही सुचेना काही रुचेना. फडक्यांची गुजगोष्ट वाचावी म्हणजे मनाला किन्चित् प्रसन्नता वाटेल म्हणून गुजगोष्टींचं पुस्तक हातात घेतलं व आरामखुर्चीवर पडले. तोच केवढ्या मोठ्यान्दा गडगडाट झाला. दचकलेच मी. हातातील पुस्तक पट्कन् पायाशी पडलं ! मी बावरून खिडकीतून बाहेर पाहिलं. वीज काळ्या पडद्यापुढं नृत्य

करीत होती. काळाकुट्ट अन्धार सगळीकडं पसरला होता. माझ्या उदास मनाला उगीच हुरहूर लागून राहिली. आजच शशीचं पत्र आलं होतं, की मी खुशाल आहे म्हणून. मग हुरहूर तरी का वाटावी. काहीच उमजेना. घड्याळाकडं पाहिलं! आठला दहा मिनिटं कमी होती. वाटलं सिनेमाला जावं म्हणजे मनाचा उदासपणा होईल कमी. स्वयपाकघरात आईच्या कानावर घालून छत्री घेऊन मी थिएटरच्या रोखानं निघाले. फर्स्ट क्लासच तिकिट काढून थिएटरमध्ये गेले. चिक्कार भरलं होतं थिएटर. Snow White and The Seven Dwarfs ही फिल्म होती. मला जागा काही चाङ्गली मिळाली नाही. सिनेमा सुरू झाला होता. मी कडेलाच बसले. थोड्याच वेळात मी ती फिल्म पाहण्यात इतकी रङ्गून गेले की माझा उदासपणा त्या वेळी कुठल्याकुठं लोपून गेला. इन्टर्व्हलला दिवे लागले. मी सभोवार पाहिलं!

माझ्या उजव्या बाजूला माझी नजर वळली, तो धडकीच भरली माझ्या हृदयात! त्या व्यक्तीचा चेहरा पाहून माझ्या गात्रागात्रातून भीतीची चमक येऊन गेली. त्याचे डोळे दारू प्याल्यासारखे लाल व धुन्द दिसत होते. त्याच्या नजरेत लाण्डग्याची क्रूरता व गिधाडाची तीक्ष्णता दिसत होती. त्या चौकोनी राकट चेहऱ्यावर भेसुरता पसरली

होती. भुताचा चेहराहि याहून मेसूर नसेल असं मला वाटलं. मी अङ्ग चोरून उठले, दोन्ही हातानी धडधडत्या हृदयाला सावरीत थिएटरच्या बाहेर पडले. तिथून धूमच ठोकली नि घर गाठलं. आई कायसं बोलली, पण माझं लक्षच नव्हतं तिकडं. खोलीत जाऊन कॉटवर अङ्ग टाकलं. अगदी गच्च डोळे मिटून पडले; पण डोळयापुढचा तो चेहरा काही हलेना! किती राकट नि उग्र चेहरा होता तो! त्याची ती विषारी नजर; छे! अजून अङ्गावर शहारे येत होते. अगदी अस्वस्थ नि बेचैन जीव झाला माझा!

मान उचलून समोर पाहिलं, तो शशीचा हसरा नि मोहक चेहरा दृष्टीस पडला! समोरच्या चित्रातून त्यांचा हसरा, आकर्षक चेहेरा व मिस्किल डोळे माझ्यावर अमृताचा वर्षाव करीत होते. त्या हसऱ्या चेहऱ्याकडं किती तरी वेळ मी पाहत बसले होते. उदास मन केव्हां प्रफुल्लित झालं याची कल्पनासुद्धा आली नाही तेव्हां!

चेहऱ्यावरून माणसाची पारख करता येते म्हणतात; खरंच का हे? चेहरा हा अन्तःकरणातील विचारांचा आरसा असतो, नाही का? त्याखेरीज का काही चेहऱ्याबद्दल प्रेम, तर काहीबद्दल तिरस्कार उत्पन्न होतो? माझीच गोष्ट घ्या ना! त्या थिएटरमधल्या माणसाची नि माझी ओळखसुद्धा नव्हती. पण चेहरा पाहताच माझ्या मनात त्याच्याबद्दल

तिरस्कार का बरं वाटावा? याच्या उलट शकुन्तलेच्या चेहऱ्याकडं पाहताच राजा दुष्यन्ताला नाही का मोह पडला.

कित्येकांचे चेहरे पाहताच–ओळखदेख नसताहि –त्यांच्याविषयी प्रेम वाटू लागतं; तर काहीच्या चेहऱ्याकडं पाहताच अकारण तिरस्कार उत्पन्न होतो. मी इङ्ग्रजी पाचवीत होते तेव्हां! आमच्या संस्कृत शिक्षकाचा चेहरा सदा सुतकी. त्यांच्या चेहऱ्यावर हास्याची रेषा उमटलेली मी कधीच पाहिली नाही. का कुणास ठाऊक, पण त्यांच्या-विषयी मला आदर, अभिमान अथवा आपलेपणा कधीच वाटला नाही. याच्या उलट आमचे मराठीचे मास्तर! त्यांच्या चेहऱ्यावर सदा आनन्द खेळत असायचा! त्यांचा तास केव्हां सम्पला हे सुद्धा कळायचं नाही. साऱ्या वर्गात चैतन्य भरून उरत असे.

बाकी माणसांचे चेहरे हे अन्तःकरणातील विचार–विकाराचे आरसे असतात याची सत्यता वहिनीच्या उदा-हरणावरून पटते! त्या वरून कितीहि हसल्या तरी त्यांच्या हृदयात सलणारं दुःख त्यांच्या चेहऱ्यावर नकळत उमटत असतं! आमची यमूताई, सदान्कदा कावऱ्याबावऱ्या नि भेदरट नजरेनं काही तरी शोधत असल्यासारखी सगळीकडं बघते. काय तिचं हरवलं आहे न कळे! आमच्या मामांचा चेहरा पाहताच त्यांच्या जमदग्नीच्या स्वभावाची कुणालाहि

खांत्रा पटेल. कुणावर ना कुणावर तरी स्वारी सारखी खेकसत असते. याच्या उलट आमची मामी! आनन्दानं भरलेला कलशच जणू! सदा मुखातून हास्य ओसण्डत असतं. शशीच्या मुखावर आनन्दाबरोबर खोडकरपणाची झाक नाही का मारत?

इतके नाना तऱ्हेचे चेहरे माझ्या नजरेस नेहमी पडतात; पण आज रात्री सिनेमा थिएटरात पाहिलेला चेहरा—

आई गऽ! अजून अङ्गावर काटा उभा राहतो आहे माझ्या!

  

## १८ : : : : : : गप्पा

"जीवनांत स्त्रीचं स्थान जितकं महत्वाचं तितकंच गप्पाचं यात संशय नाही. मानवी जीवनातून स्त्रियाना वगळा, त्याचं रुक्ष वाळवण्ट बनायला वेळ लागणार नाही. तारु-ण्यात प्रेम करणार नाही अशी प्रतिज्ञा जितकी फोल ठरते तितकीच गप्पा मारायच्या नाहीत अशी जर कोणी प्रतिज्ञा केली तर ती सुद्धा फोल ठरल्याशिवाय राहणार नाही." असं बोलून त्या तरुणानं मिस्किल हास्य केलं. आम्हा सर्वांच्या मुखावर मधुर स्मिताची लहर उद्भूत झाली.

दिवाळीची सुट्टी सुरू झाली होती. आम्ही 'झोन्ये' बनून निघालो होतो दिल्ली आग्र्याला. सन्ध्याकाळी बोरीबन्दरवर पन्जाब मेल गाठली. किती गर्दी होती त्या गाडीला! आम्हा सहा मैत्रिणींना कुठं जागा मिळेना. फिर-फिर फिरलो! एका निमगोऱ्या, नाकेल्या पण पाणीदार नेत्राच्या तरुणानं आम्हाला एका डब्यात जागा करून दिली, नि आमचा प्रवास सुरू झाला. तो तरुणहि चालला होता ग्वाल्हेरला. आम्हाला बराच वेळ त्याची सोबत मिळणार होती.

खाड् खाड् खाड् आवाज करीत पन्जाब मेल धावत होती. स्टेशनामागून स्टेशनं जात होती. अन्धःकार पृथ्वीला ग्रासू लागला. आमच्या गाडीनं कल्याण मागं टाकलं. डब्यातील इतर माणसं मिळेल तेवढ्या जागेत झोपण्याच्या तयारीस लागली. पण माझ्या मैत्रिणी आणि तो तरुण गप्पा मारण्यात गढून गेली होती. मी खिडकीबाहेर तोण्ड काढून पहात होते. वद्य पक्षाचे दिवस! चन्द्रानं काढली होती रजा. सारी सृष्टी अस्फुट सौन्दर्य उधळीत होती. वृक्षाच्या, वनराईच्या व डोङ्गरांच्या कृष्णाकृति गम्भीर-पण मनोहर भासत होत्या. साऱ्या सृष्टीवर एक प्रकारचे गूढ पण उत्कण्ठित वातावरण भरून राहिलं होतं, म्हणूनच की काय, आमच्या गाडीची धडधड अधिक जोरानं चालू होती! मी गाडीबाहेरील दृश्यपट पाहण्यात गढून गेले होते, तर आत

यांच्या गप्पांना रङ्ग चढत होता. कुठल्याशा स्टेशनवर गाडी थाम्बली. ४–५ उतारू तिथं उतरल्यानं आम्हाला थोडी ऐसपैस जागा झाली. मी माझा होल्डऑल पसरला.

"जीवन आगगाडीसारखं आहे, नाही? तुम्हाला काय वाटतं?" त्या तरुणानं प्रश्न केला. मी चमकून म्हणाले, "काय म्हटलंत?" "नाही!......" आणि मीहि न कळत त्यांच्या गप्पाच्या प्रवाहात समरस झाले. एवढा २६–२७ तासांचा दीर्घ प्रवास,—पण आम्हाला गप्पाच्या योगानं किती लवकर आटोपल्याचा भास झाला.

गप्पा, मानवी जीवनात आनन्दाचा झरा नसल्या तरी आयुष्याच्या उद्यानात मनाला ठिकठिकाणी रिझविणारी कारञ्जी खास आहेत! मनुष्य स्वभावतः समाजप्रिय असतो; पण समाजाला एके ठिकाणी गुन्तविण्याचे रेशमी धागे मात्र गप्पाच आहेत. गप्पा मारण्याची मनुष्याची प्रवृत्ति जर नाहीशी होईल, तर आयुष्यातील निम्मा अधिक आनन्द मावळेल आणि मनुष्य निव्वळ उम्बरातील किडा बनायला वेळ लागणार नाही.

देवानी समुद्रमन्थन करून १४ रत्नं काढली. मानवप्राणी गप्पाच्या समुद्रातून विचाररत्नं बाहेर फेकतो. स्वाभाविकपणे किती तरी उपयुक्त माहिती गप्पातून आपल्याला मिळते. पण कधी कधी ही रत्नं 'मुक्ताफळं'हि ठरतात.

गप्पा हा मैत्रीची साखळी जोडणारा दुवा आहे. उन्हाळ्यात वळवाचा पाऊस येतो तसा जातोहि भर्रकन्; पण सूर्य-किरणानी तप्त झालेली पृथ्वी शान्त होतेच की नाही? गप्पाना सुद्धा असाच भर्रकन रङ्ग चढतो, अन् उतरतो; पण जीवनातील कठीण कर्तव्य केल्यानंतर गप्पांच्या चार शब्दरूपी थेम्बांच्या शीतल सिञ्चनानं तरतरी खास येते.

वाङ्मय ही सुद्धा गप्पांची मोठी आवृत्तिच म्हणता येईल. आन्तरिक भूक, साहित्यिक, लिखाणाच्या द्वारे शमवितात! त्यांची काव्यं, कादम्बऱ्या ह्या मोठ्या गप्पाच नाहीत का? प्रवास सुखकर व्हावा म्हणून रस्त्याच्या दुतर्फा जसे वृक्ष लावलेले असतात. तसेच मानवी जीवनाच्या रूक्ष आयु:पथावर गप्पांचे वृक्ष मनुष्य निर्माण करतो. मी अनेक वेळा कित्येकांच्या तोण्डून ऐकलंय्, की गप्पा मारून काय पोट भरतय्? पण मला वाटतं, उन्हाळ्यात या फुला-वरून त्या फुलावर उडणाऱ्या विविधरङ्गी फुलपाखरापासून जगाला काय फायदा आहे! दररोज सुगन्धी–रम्य फुलं उमलतात त्यांचा मनुष्याला वस्तुतः काय फायदा आहे? चिमण्यासारखे इवले इवले जीव उगीचच चिवचिव करीत उड्या मारीत असतात; त्यांचा जगाला काय उपयोग? आकाशाचा निळा पडदा बाजूला सारून किलकिल्या नेत्रानी मिस्किल हास्य करीत, मानवांचे रात्रीचे व्यवहार निरीक्षण

करणाऱ्या रम्य तारका, मञ्जरींनी बहरलेल्या आम्रवृक्षाच्या शाखेवर बसून कुहू कुहू करणारी कोकिळा, यांच्यापासून काय फायदा ? या गोष्टीपासून प्राप्त होणारा निर्मल आनन्द हाच अमूल्य फायदा आहे. अन् असाच आनन्द गप्पापासून होतो.

खाण्डेकर गप्पाना मानवी मनाच्या आकाशातील लुकलुकणाऱ्या चान्दण्या म्हणतात; पण मला असं वाटतं, की मानवी मनाच्या अन्तराळात हळुवार विहरणाऱ्या वायु-लहरी म्हणजे गप्पा ! शिणलेल्या शरीराला व मनाला वायु-लहरी जशा उत्तेजित करतात तशाच गप्पा शिणलेल्या मनाचा भार हलका करून त्याना उत्तेजित करतात, नाही का ?

  

## १९ : : : : प्रत्येकाचं जग

एकाच घरातल्या चार बहिणी होत्या त्या. रूपादेहात किती सारखेपणा ! एकाच आचारविचारांच्या घडणीनं घडविलेल्या. बाहेरच्या जगात जवळ जवळ एकाच तऱ्हेनं आचरण करणाऱ्या, पण प्रत्येकीचं आतलं जग मात्र परस्पराहून किती भिन्न होतं ! प्रत्येकीच्या जगाची मर्यादा माण्डणी, सजावट, आतील व्यक्ती, ध्येयं भिन्न भिन्न ! तसंच पाहिलं तर जगात प्रत्येकाचं जग निरनिराळंच नाही का ? प्रत्येक मनुष्याचं विश्रामस्थान म्हणजेच त्याचं वैयक्तिक

जग ! बाहेरच्या जगातील धकाधकीनं व्याकूळलेला जीव शेवटी आतल्या जगाच्या आसऱ्याला नाही का येत ? बाह्य जगातील दुक्खं त्याच्या जगात येऊ नाही शकत. आपल्या जगात मात्र तो केन्द्रस्थानीच असतो.

सात आठ वर्षांपूर्वीच्या शाळेतील जीवनाच्या वेळच्या गोष्टी आठवतात मला. मी अन् शशी कशी भविष्यकालीन जीवनाची माण्डणी करीत असू. आकाङ्क्षाच्या मोहक धाग्यानी विणलेल्या सुन्दरशा चिमुकल्या जगात किती आनन्दानं राहत होतो आम्ही. खूपखूप शिकावं, अविवाहित राहावं, अनाथ स्त्री-मुलासाठी संस्था काढावी, नानाविध आकाङ्क्षाच्या रङ्गीबेरङ्गी सुवासिक पुष्पांचा परिमल सेवन करीत तासन् तास बसत असू आम्ही. तेच ते आम्ही ! बाह्य जगहि तेच ! पण किती क्रान्ती झाली त्या जगात. पण अजूनहि माझं जग मला किती रमणीय वाटतं ! त्यातील जीवनाची माधुरी मला तरी अजून अवीटच वाटते.

स्वच्छन्दी फुलपाखराच्या जगाचा अनुभव आपणास बालपणात येतो, नाही ? किती निष्काळजीपणानं नी आनन्दी वृत्तीनं खेळत बागडत असतो आपण आपल्या जगात ! भोवतालच्या बाह्य जगाचं स्मरणच नसत आपल्याला मुळी. नेहमीच या जगात आपणाला राहावसं वाटतं.

तुकारामांना सुद्धा ‘ लहानपण देगा देवा ’ म्हणून विठाई माउली जवळ हट्ट घ्यावासा वाटला नाही का ?

प्रत्येकाचं जग निराळं नसतं तर कोकिळा वसन्त ऋतूतच का गायिली असते ? तिच्या जगात वासन्तिक जीवनात काही तरी स्वर्गीय आनन्द असावा म्हणूनच त्या आनन्द सागरावर गायनाचे तरङ्ग उमटतात ना ? प्रत्येकजण आपापल्या जगात दङ्ग झालेला असतो. त्याच्या जगात त्याच्या तृषित हृदयाला सुधातुल्य जीवनाचा लाभ होतो. म्हणूनच त्याला आपल्या जगाविषयी ओढ वाटते. आपल्याच जगात खरं सौख्य आहे असं तो मानीत असतो. बाहेरच्या जगाची त्याला म्हणूनच विस्मृति होत असते.

आमचे नारू तात्या नेहमी म्हणतात ‘ जग हे असार माया केवळ. ’ मला भारी राग येतो त्यांच्या या बोलण्याचा. त्यांच जग त्याना असार दिसत असेल, पण माझं जग मला कुठं असार आहे ? माझ्या जगात आनन्दाची फुलबाग सदैवच फुललेली आहे. माझ्या जगात नेहमीच प्रीतीचं चान्दणं फुललं आहे. मग अशा जगाला असार म्हटलं तर मला राग का न यावा ?

माझे हे विचार ऐकले की शशी नेहमी म्हणतो ‘ सागरिके, माझं जग मात्र काट्याकुट्यानी भरलेलं आहे. त्यातील मार्ग तर इतके बिकट आहेत की, नको ते जीवन

ासं होऊन जातं कधी कधी. पण माझं जग नेहमीच असं ाहील असं मात्र समजू नकोस. अग, हे काटे बाजूस ारूनच आपण आपलं जग रमणीय बनविलं पाहिजे. ुलाबाचे काटे चुकवूनच ना आपण पुष्प तोडण्याचा प्रयत्न ारतो. त्याचप्रमाणे माझ्याहि जगाचं आहे!'

त्याचं हे बोलणं ऐकून मला वाटतं प्रत्येकाच्या ागात जाऊन जर एकरूप होता येत असतं तर किती गोड ालं असतं, नाही? मग मला फुलपाखराच्या जगाचा हेवा ाटला नसता. चन्द्राच्या जगात जाऊन चान्दण्याशी ुजगोष्टी करीत बसले असते मी! शशीच्या जगातील ाट्यावर माझा देह टाकून मी त्याला मार्ग करून दिला ासता. मग ऐकमेकाचं जग कसं असतं हे समजणं किती ोपं झालं असतं!

पण मग त्या प्रत्येकाच्या जगात आनन्द तरी कसा ाहिला असता? आपल्या जगात हे म्हातारे येऊन आमच्या ानन्दात विरजण पाडतात की काय अशी तरुण-तरुणींना ाती पडली असती. अन् तरुणींच्या जगात तर काय... ाशय पिशाच्चानं सारखं थैमान घातलं असतं. नि मग त्या ागातला आनन्द कुठल्या कुठं पळून गेला असता.

प्रत्येकाचं जग भिन्न आहे म्हणूनच जीवनात नाविन्य ाे माधुर्य आहे!

## २० : : : : : पतङ्ग

'ताई, ताई, बघ मी साङ्गितलं नाही तुला ? तुला जमायचं नाही पतङ्ग उडवायला. बायका त्या बायका !' श्री म्हणाला.

किती तरी वेळ मी प्रयत्न केला पतङ्ग उडविण्याचा पण शेवटी माझा पतङ्ग शेजारच्या झाडाच्या फान्दीत अडकून बसला. स्त्रिया कुणाच्या जीवनाचं सूत्र हलवू शकत नाहीत का ? त्यांनाच पतङ्गाप्रमाणं आकाशात विहरावं लागतं ! मग -- त्यांच्याच जीविताचं सुकाणू धरावयाला

कर्णधाराची आवश्यकता का बरं असावी ? सूत्राच्या आधाराशिवाय त्यांची अवस्था भडकलेल्या वावडीप्रमाणं का व्हावी ? स्त्रियानी असा कुठला अपराध केला होता की त्यांच्या कपाळी जगाच्या सुरवातीपासून ते अन्तापर्यन्त 'न स्त्री स्वातन्त्र्यमर्हति' हा शिक्का मारला जावा ? निर्बलतेच्या सूत्रानं जखडलेल्या स्त्रिया कधी मुक्त व्हायच्या ? एकाकी जीवन कण्ठणं तिला अशक्य असलं म्हणून तिला मानव्याचे सामान्य अधिकार सुद्धा असू नयेत हं ! मन, बुद्धि, भावना तिला पारख्या असतात का ?

भावनाप्रधान स्त्रीचं जीवन मला तर पतङ्गासारखंच वाटतं. भावनेच्या सूत्रावर उंच उंच भरारी घेणाऱ्या स्त्रीचा पतङ्ग दुसऱ्याच्या कणखर व्यवहारसूत्रानं तोडला गेला तर तिला स्वर्गीय सुखाच्या वातावरणातून जगाच्या रूक्ष दुःखी गर्तेत पडण्याची पाळी येतेच ना ! बालपणापासून पतङ्गासारख्या कल्पनेच्या उंच उंच भराऱ्या माराव्यात, अन् दूर निळ्या नभातील चमचमणारी सुगन्धी फुलं ओच्यात घालून त्यांची सुन्दर माळ तयार करावी नि ती आपल्या हृदयात पूजलेल्या देवाला प्रेमानं वहावी अन् त्याच्या हातात हात घालून फुलपाखरासारखं भटकत फिरावं-किती तरी कल्पना केलेल्या पण परिस्थितीच्या काचात कल्पनेच्या पतङ्गाला परत जमीनीवरच फाटून पडावं लागतं. काय हा

दैवदुर्विपाक ? याला जबाबदार कोण ?

स्त्रियांचं एक सोडून दिलं पण हल्लीच्या तरुणांची तरी काय स्थिती आहे ? विद्यालयाच्या आकाशात स्वच्छ-न्दानं भरारी मारणारा हा पतङ्ग बापाच्या मनिऑर्डरीचा धागा तुटला की कुठे जाऊन धडकेल याचा नियम नाही. हे कृत्रिम पतङ्ग आम्हाला कुणी केलं ? परिस्थितीनं ? छे ! मग कुणी परकीय सत्तेनं ? होय ! पण ही दुर्बलता तरी आपण का स्वीकारली ? परकीयांच्या सुधारणांच्या दिमाखाला दिपून जाऊन त्यांच्या हातचं बाहुलं बनण्यात सुख वाटलं ना आपल्याला ? गरुड बनण्याची महत्त्वाकाङ्क्षा धरली पण पतङ्ग तो पतङ्गच राहिला शेवटी. पङ्ख कापून टाकलेल्या पक्ष्याला उडता येतं का ?

या निर्जिव पतङ्गापेक्षा खरेखुरे सजीव पतङ्ग झालेलं काय वाईट ? अफाट आकाशात ध्येयशून्य नि दुसऱ्याच्या मर्जीप्रमाणं भटकण्यापेक्षा तेजस्वी ज्योतीत मिसळून जळून गेलेलं काय वाईट ? त्या ज्योतीच्या दिव्य तेजानं एकरूप होण्यासाठी स्वत्वाची आहुती देणाऱ्या पतङ्गाचा स्वार्थत्याग किती दिव्य ! आम्ही स्त्रिया करू शकतो असा दिव्य त्याग पण त्यासाठी दिव्य तेजाची अपेक्षा हवीच ना !

नाही तर दुसऱ्याच्या हातात जीवनाचं सूत्र देऊन त्याच्या मर्जीप्रमाणं आकाशात भ्रमण करायचं आहेच

आमच्या नशीबी ! त्यातून एका जवळ दुसरा पतङ्ग आला की झालीच गुन्तागुन्त. असं का बरं होतं ? कुणी विचारच करीत नाही. त्यांच्या दैवाचे सूत्रधार भिन्न असतात म्हणूनच हा त्यांच्या आयुष्याचा असा खेळखण्डोबा होतो. परिस्थितीचा वारा नि सूत्रधाराची इच्छा हीच त्यांच्या चलन-वलनाची साधनं ! स्वतन्त्रपणानं विहरण्याची कुठं परवानगी आहे ? किती परावलम्बनी जिणं हे ?

मानवी मनोरथसुद्धा दैवाच्या सूत्रानं बान्धले गेल्या-मुळं दुबळेच ठरत नाहीत का ? प्रयत्नांची कमाल करूनहि कधी कधी त्याना सत्यस्थितीत खरे ठरता येत नाही.

सारे ग्रहगोल हे गुरुत्वाकर्षणाच्या सूत्रानं जखडल्यानं पतङ्गासारखे विश्वाच्या अनन्त पोकळीत सूत्रचालकाच्या इच्छेप्रमाणे विहार करीत आहेत. त्यांचीच काय पण प्रत्येक प्राणिमात्राची स्थिति या पतङ्गासारखीच आहे.

पण मला मात्र आकाशात विहार करणाऱ्या पतङ्गा-पेक्षा ज्योतीवर झडप घालून आत्मसमर्पण करणारा पतङ्गच व्हावसं वाटतं !




## २१ : : : : : जीवनसुख

सकाळची वेळ म्हणजे किती उल्लसित असते, नाही? म्हणूनच मला मोह आवरत नाही त्या टेकडीवर रोज फिरायला जायचा! निसर्गानं किती मनोज्ञ चञ्चल स्वरूप घेतलेलं असतं. सकाळी बालभानूच्या मधुर सुषमेत सारी सृष्टी न्हाऊन निघालेली असते. अशावेळी चिमण्या पाखरांची गोड किलबिल ऐकत मन्द वायूच्या शीतल हातात हात घालून टेकडीवरील तो हिरवागार गालिचा चढताना कुठल्या तरी आनन्दाच्या निराळयाच जगात

आपलं पाऊल पडल्या सारखं वाटतं नि मला जीव साद देतो 'जीवनातील सुख सुख ते हेच आहे, नाही?'

जीवन म्हणजे आयुष्यातील दुरून दिसणारी गोण्डस टेकडीच नव्हे का? उत्साहानं आनन्दाचं मन्जुळ गीत गात–ऐकत–नि जिवाच्या माणसांच्या हातात हात घालूनच ही जीवन टेकडी चढायची असते. आयुष्य म्हणजे जीवन-मार्गातील गालिचा नि आशा-निराशा हे दोन वाटाड नव्हेत का? आशा-निराशेनं दाखविलेल्या मार्गावरून सुखाच्या आशेनं मार्ग कापीत असता प्रत्येक जीवांच्या हृदयाला किती तरी वेगवेगळी आन्दोलनं मिळत असतात!

माझ्या ताईचं नव्हतं का तसं! अशोकाशी विवाह-बद्ध होऊन प्रेमाच्या सोनेरी शृङ्खला पायात अडकवून घेताना किती आनन्द झाला तिला! कल्पनेनं भावी आयु-ष्याचे उंच उंच बङ्गले बान्धताना भक्कम पायाचा विचारहि शिवत नव्हता तिला. सौख्याचं पुरेपुर माप तिच्या पदरात पडलं आहे असंच वाटे तिला. दोन वर्षं किती सुखात गेली तिची. पण सुखाची सुगन्धी फुलं लवकरच कोमेजली नि खुपणाऱ्या काट्यानी आपल्या अस्तित्वाची जाणीव करून दिली. तिचं जीवनहि नंतर काट्यानी भरून गेलं. जीवनातील काटे काय एका तऱ्हेचे असतात? सुखाचं गोड स्वप्न डोळ्यापुढून नाहीसं व्हावं अन् मग एक तऱ्हेची

खिन्नता वाटते मनाला तसंच झालं तिचं! सुखाचा फुलोरा ओसरला नि जीवनातील सुख दृष्टी आड झालं. सुखाचं शिखर दृष्टी आड होताच किती दिशाभूल झाली तिची! सभोवती अन्धारून आल्यासारखं झालं! पण सुखाकरता मन धडपडत होतंच! जीवन हेच मुळी एक गोड सुख आहे. नाही तर त्यासाठी कशाला एवढी झाली असती यातायात?

निराशेचे मेघ निवळले, दुःखाचा पाऊस थाम्बला, संशयाच्या विजा चमकेनातशा झाल्या नि मग हळूच आशेला हाताशी धरून सौख्य डोकावू लागतं जीवनात. सुखाला पाहिलं की, नव्हे केवळ सुखाच्या कल्पनेनंच, मन कसं आनंदी होतं. मग असं वाटतं, मनुष्य याच जीवन-सुखासाठी धडपडत असेल.

केवळ जगण्यात जीवनसुख नाही. जीवनातील आत्यन्तिक आनन्दाचा आस्वाद घेत असता देहभान विसरून तो आनन्द चिरकाल लुटीत राहणं यालाच जीवनसुख म्हणतात का? बालकवीच्या बालमनाला असंच वाटंत असावं!

**दिव्यरसीं विरणे जीव, जीवित हें त्याचें नांव**

अशा जगण्याला जीवित म्हणावं; नाही तर कुत्री मान्जरं सुद्धा तुकडे खाऊन पोट भरतात. आजकाल धन्याची थुंकी

झरून वारा येईल तशी पाठ फिरविणाऱ्या सुशिक्षितांच्या जगण्यात जीवनातील अपूर्व सुख कुठून आढळून येणार ? जीवन ही लढाई आहे असं खाण्डेकर म्हणतात ते काही खोटं नाही. या लढाईत यशस्वी होता आलं नाही तरी चालेल, पण ती लढाई शेवटपर्यन्त धीरानं लढणं यातच खरं सुख, नाही का ? It is not life that matters, it is the courage you bring to it. असं ह्यूज वालपोलनं म्हटलं आहे, ते खोटं नाही. जीवनातील सुख हे पळपुट्या-साठी नाही, ते धैर्यानं परिस्थितीशी टक्कर देणाऱ्या वीराला लाभत असतं. जीवनयुद्धातून हळूच पोबारा करणाऱ्यास खऱ्या सुखाची प्राप्ती मुळीच होत नाही.

जीवन म्हणजे सुखाची फुलं देणारी एक काटेरी वेलच आहे. सुखाची फुलं हाती येण्याच्या आगोदर दुःखाच्या काट्यानी हात रक्ताळतात, नि जीवन त्याज्य वाटू लागतं. मग सुखाची फुलं खुडण्याचा प्रयत्न अर्ध्यावरच सोडावा लागतो. अशावेळी निराशेच्या काचणीनं सन्त्रस्त झालेला जीव, जीवन असार आहे म्हणून टाहो फोडतो. गरीब विचारा !

तरी पण भविष्याच्या सागरावर कल्पनांच्या लाटांचं नृत्य सुरू झालं की त्यावर तरङ्गण्यात किती मादक सुख असतं, नाही ? म्हणूनच जीवन सुखमय आहे, यावर जीव

विश्वास ठेवतो. या सौख्याच्या गोड आशेवरच मानवी जीव जीवन कण्ठीत असतो. पण या सुखासाठी त्यागाची आवश्यकता असते. जीवनसुखाचा पाया त्याग आहे. भोग नाही. भोगानं सुख मिळाल्याचा भास होतो, पण खरं सुख दूरदूरच पळून जातं. निष्काम त्यागात सुखाची प्राप्ती होते.

जीवनसुख म्हणजे त्याग असं म्हटलं तर चुकलं कुठं?

  

## २३ : : : : : स्मृतिपुष्पे

'उत्तररामचरित' वाचीत होते मी काल रात्री. लक्ष्मण, राम आणि सीता या दोघाना चित्रपट पहाण्यासाठी घेऊन गेला. सीता चित्रपट पाहू लागली. दोघांच्या जीवनातील विविध प्रसङ्गाची चित्रं होती ती ! त्या चित्रांच्या दर्शनानं तिच्या मनात पूर्वीच्या स्मृतीहि जागृत झाल्या. ते-ते प्रसङ्ग जणू काय आज घडत आहेत या कल्पनेनं तिचं कोमल अन्तःकरण विकारवश झालं. सुखदुःखांची आन्दोलनं बसून अन्तरीची अस्वस्थता वाढू लागली. हो, का

नाही वाढणार? काही स्मृती किती मधुर! गोदावरीच्या परिसरात रामाच्या सहवासात 'अविदितगतयामा रात्रिरेवं व्यरंसीत्' असे उद्गार काढावयास लावणाऱ्या स्मृती किती असीम मधुर होत्या. गुलाबाच्या पाकळ्याच्या राशीत खेळत असल्याचा भास झाला असेल नाही तिला? पण मारीच, रावणाच्या दर्शनानं किती दुक्खद स्मृती उत्पन्न झाल्या असतील! गुलाबाच्या शय्येतून काळा नागच निघावा असं झालं असेल तिला. त्या स्मृती जर विस्मृत झाल्या असत्या तर किती बरं झालं असतं असं तिला खचित वाटलं असेल. पण जीवनात वसन्ताच्या वैभवा बरोबर ग्रीष्माचा उजाड-पणा पत्करावा लागतोच ना? स्मृती हा कधी कधी शापहि नसतो का?

खरंच माणसाला जर जीवनात स्मृती राहिली नसती तर? मग जगात माणसं व जनावरं यात मुळी अन्तरच राहिलं नसतं! या स्मृतीवर तर जगात आपल्या संस्कृतींचा डोलारा उभारला आहे. स्मृतीच्या गोड सुगन्धात झिङ्गूनच मानव आपल्या प्रगतीचं पाऊल पुढं टाकीत असतो. तरी सुद्धा पुढं पाऊल टाकणाऱ्या जगालाहि विस्मृतीचा शाप बाधतोच. मोठमोठ्या संस्कृती उदय पावल्या नि अस्तास गेल्या. त्या आज नाममात्र राहिल्या असल्या तरी विस्मृतप्राच नक्को का समजायला?

विस्मृत साम्राज्याच्या स्मृती जरी आज नसल्या तरी स्वतःच्या जीवनातील गतायुष्यातील स्मृतींच्या फुलांचा सुवास घेण्यात मनाला किती समाधान वाटतं! जीवन सागरावर येणाऱ्या तरङ्गानी किनाऱ्याशी येऊन गुज-गोष्टी कराव्यात, तशाच त्या स्मृती येऊन जीवनात हृदयाला उल्लसित करतात, नाही का? त्या तरङ्गात नि स्मृतिपुष्पात किती साम्य आहे?

जीवनातील स्मृती! हं माझ्या जीवनाच्या गतायुष्यातील स्मृती! रातराणीच्या मधुमत्त परिमलानं सारं वातावरण भरून जीव कसा धुन्द होऊन जातो. तसंच होतं मला. चित्राताईचं नि माझं एकमेकावर किती प्रेम! पण त्या प्रेमसागरावर भाण्डणाच्या लाटाहि कधी कधी उद्भवत —पण क्षणभरातच त्या विरून आम्ही हातात हात घालून तरङ्गासारख्या गुजगोष्टी करीत असू! त्यावेळच्या त्या बालिश लीलांची स्मृती झाली की अजून जीव कसा खुलून जातो.

नुकताच तारुण्यात प्रवेश केला होता मी. जीवनात निशेचं साम्राज्य सम्पून अरुणाचा उदय झाला होता तेव्हां! किती मधुर आकाङ्क्षानी हृदय भरावून गेलं होतं! त्या-काळच्या स्मृती आजहि ताज्याच आहेत. अजून त्या फुलांची टवटवी ताजीच आहे. त्या सुवासानं शरिरातून कशा गोड समोह लहरी उत्पन्न होताहेत. हृदय आनन्द सागरावर

नाचत आहे.

पण माझ्याच सारखी साऱ्याच तरुण तरुणींची गोष्ट नाही का? प्रत्येकाच्या जीवनात अशाच काही मधुर स्मृती असतात की त्याच्या पुनरावृत्तीनं त्यामधील गोडी कमी न होता उलट प्रतिक्षणाला वाढतच जाते, म्हणूनच त्या स्मृती-साठीसुद्धा तरुण जीव, जीवहि देण्यास तयार होईल.

हो, स्मृती कितीहि चाङ्गल्या असल्या तरी त्या ज्या काळात होतात, तो काळ नको का चाङ्गला असायला? वैभवाच्या वेळच्या स्मृती कितीहि मधुर असल्या तरी जर त्या आपत्काली झाल्या तर त्या विन्चवासारख्या दंशच नाही का करणार? नेपोलियनला सेन्ट हेलिना बेटात बन्दीत असताना होणाऱ्या स्मृती किती तापदायक होत असतील, नाही? तारुण्य सम्पण्यापूर्वीच स्त्रियाना मृत्यू यावा असं म्हणतात याचं कारण हेच असेल काय!

याच्या उलट चाङ्गल्या काळात आपत्कालच्या स्मृती जरी दुःखद असल्या तरी त्याहि एक प्रकारचा आनन्द देण्यास समर्थ असतात. रामानी आपल्यासाठी केलेल्या शोकाचं चित्रात्मक प्रतीक पाहून सीतेला दुःख खचित झालं असेल. पण त्यातहि आपल्यावरील रामाचं अपूर्व प्रेम पाहून तिच्या दुःखी हृदयास आनन्दाचं समाधान लाभलं असेल नि म्हणूनच त्या पम्पासरोवराचं सौन्दर्य पहाण्याच्या मिषानं

तिला ते चित्र पुनःपुन: पहावसं वाटलं असेल. लक्ष्मीबाई टिळकांना आपली स्मृतिचित्रं रेखाटताना काय वाटलं असेल? गतायुष्यातील स्मृतिचित्राकडं निर्विकार दृष्टीनं पहाण्या इतपत त्यांची वृत्ति स्थितप्रज्ञाची झाली असेल का? नसल्यास त्या स्मृतींनी त्यांना किती तरी वेदना झाल्या असतील? कदाचित् लौकिक समाधानाच्या अपूनं त्यानी आपल्या वेदना विसरण्याचा प्रयत्न केला असेल. पण मला मात्र त्यांच्या वेदना त्यांच्या शद्बाशद्बातून अनुभूतीस येत.

आत्मचरित्र लिहिणाऱ्या व्यक्तीस गतायुष्यातील स्मृतींनी काय बरं वाटत असावं? महात्मा गान्धीना 'सत्याच्या प्रयोगा'त अहङ्काराची का आत्मविश्वासाची छटा दिसत असेल? का पण्डित जवाहरलाल यांच्या सारखं असामाधान, का केळकरांच्या सारखं समाधान लाभत असेल! जसा ज्याचा जीवनाकडे पहाण्याचा दृष्टीकोन त्याप्रमाणं त्याच्या स्मृती त्याला सुख किंवा दुःख देणार.

अस जरी आहे तरी गतस्मृती या फुलासारख्या आहेत यात सन्देह नाही. काही फुलं सुवासीक तर काही गन्धहीन असतातच. काही भडक रङ्गाची तर काही नाजूक रङ्गच्छटा दर्शविणारी. काहीचा आकार सुन्दर तर काही बेढब. काही फुलांचा वास तर डोकचं उठवितो—

स्मृतिपुष्पांचंहि असंच नाही का?

## २३ : : : पहिलेपणाचं नावीन्य

माझ्या एका मैत्रिणीनं एका बिजवराशी लग्न केल्याची बातमी नुकतीच वृत्तपत्रातून प्रसिद्ध झाली होती. ती वाचून पहिल्या प्रथम आम्ही तर थक्कच झालो. किती तरी बोलून घेतलं तिच्या या कृत्यावर आम्ही. माझी एक मैत्रिण मध्येच म्हणाली, 'या लग्नात तिला कसलं सुख लागणार? तिच्या पतिराजात पहिलेपणाचं नावीन्य कुठं राहिलं आहे!' तिच्या या वाक्यानं माझ्या हृदयात किती खळबळ उडाली! खरंच, मानवी जीव पहिलेपणाच्या

सुखाची प्राप्ती व्हावी म्हणून किती धडपडत असतो! पण सुख हे पहिलेपणाच्या नावीन्यात आहे, का मनाच्या कल्पनेत आहे?

नावीन्य! पहिलेपणाचं नावीन्य! हो, त्यासाठी तर जीव किती भुकेलेला असतो. अतिपरिचयानं वस्तूतील सौन्दर्य कमी भासमान होतं म्हणतात. पण कवींच्या प्रतिभेला सामान्य, नित्य परिचयाच्या वस्तूतहि सौन्दर्य दिसतं. त्यांच्या दिव्य दृष्टीचा प्रभाव! पण सामान्य मनुष्यास मात्र ही नावीन्य पहाण्याची दृष्टी नसते. त्याला बाह्य दृष्टीचे नावीन्य दिसत असते; म्हणूनच त्याचा जीव पहिलेपणाचं बाह्य नावीन्य लुटण्यास चटावलेला असतो. गडकऱ्यासारख्या प्रतिभाशाली कवीलासुद्धा पहिल्या चुम्बनाची एवढी ओढ लागावी हा कशाचा बरं परिणाम? गडकऱ्यांच्या अवखळ वृत्तीला सूक्ष्म विचारांचा पाया नव्हताच का? पहिल्या चुम्बनासाठी मरण सोसणारे गडकरी जीवनात प्रतिक्षणी उत्पन्न होणाऱ्या नावीन्याकडं पहात नव्हते असं वाटतं.

जीवनाच्या प्रतिक्षणात पहिलेपणाचं नावीन्य उत्पन्न होत असतं. पण याची जाणीव असते का कुणाला? वाङ्मयातील पुनरावृत्ती वाचकांचे मनात आनन्द उत्पन्न करते, मग जीवनात जर पुनरावृत्ती झाली तर त्यामुळं

आनन्द का वरं होऊ नये? तसं म्हटलं तर निसर्ग तोच आहे. त्याच्यात रोज नावीन्यपूर्ण पहिलेपणा आढळतोच. पण पहाणाऱ्यात ती दृष्टी नको का उत्पन्न व्हायला?

भ्रमराच्या जीवनाचा कुणाला हेवा वाटत असेल पण मला त्याचा कधी कधी तिटकाराच येतो. पहिलेपणाचा आनन्द लुटून त्याबद्दल त्याच्या ठिकाणी कुठं कृतज्ञताबुद्धी असते? त्याच्यासाठी पहिलेपणाचा बहर अर्पण करणाऱ्या फुलाकडं नन्तर तो ढुङ्कूनहि पहात नाही याच्या उलट किती तरी पूर्णिमा येतात पण प्रत्येक वेळेस चन्द्राच्या दर्शनानं सागरिकेच्या हृदयाला अनिवार भरती येत असतेच ना! प्रत्येकवेळी तिला वाटते की, जणू काही आपल्या मीलनाचा तो पहिलाच प्रसङ्ग आहे. दरवेळी तितक्याच उत्कन्ठेनं तिचं हृदय उचम्बळून येत ना! हाच नव्हे का पहिलेपणाचा आनन्द! मातृहृदय असंच नसतं का? पहिल्या अपत्यानं ती जणू स्वर्गद्वारावरच उभी असते. पुढील अपत्यांचेवेळी प्रत्येकात तिला नावीन्य नि आनन्द वाटतच असतो. नि मग पहिलेपणातील आनन्द प्रतिवेळी द्विगुणीत होत असतो. पहिल्या मुलाचे वेळी उचम्बळून येणारं मातृहृदय दुसऱ्या मुलाचे वेळी उचम्बळून येत नाही असं थोडचं आहे? अतिपरिचयाची कल्पनाहि तिला स्पर्श करीत नाही. या भावनात्मक नावीन्याचा अनुभव घेताना किती

आनन्द वाटतो. सोनचाफ्याच्या फुलाचा दुरून कुठून तरी सुगन्ध यावा नि मन त्या सुवासानं धुन्द व्हावं तस वाटतं तेव्हां!

निसर्ग एकच असला तरी त्याला नित्य विविधरूपं घेता येतातच ना! पहिलेपणा त्याला उत्पन्न करता येतोच ना? शिशिराची वृद्धावस्था झालेली असते. नवनवलाईनं नटून वसन्तानं नुकतंच पाऊल टाकलेलं असत! वृक्षवल्लरींच्या कोवळया पानावर बालरवीची हासरी सोनेरी किरणं खेळत असतात. सौन्दर्याच्या अन् सम्पत्तीच्या दिमाखानं मोठमोठे वृक्ष आनन्दानं डोलत असतात. अशावेळी वसन्ताचा तो पहिलाच दिवस इतका नावीन्यपूर्ण असतो की ती वेळ अन् त्यातील तो पहिलेपणा नेहमी तस्साच रहावा असं चटकन् मनात येतं.

जीवन, नदीच्या प्रवाहासारखं अखण्ड आहे आणि त्यातील प्रत्येक क्षण पहिलेपणाच्या नावीन्यानं भरलेला असतो. पण त्याची जाणीव या आन्धळया जगाला नसते. ती जर उत्पन्न झाली तर सुखाला काय तोटा? त्यासुखासाठी भडक नावीन्याच्या पाठी लागायचं कारणच नाही. प्रेम-विवाहात नन्तर नावीन्य रहात नाही असं म्हणतात! पण दोष कुणाचा? त्या प्रेमी जोडप्यांचाच नव्हे का? त्यांच्या दृष्टीला कृत्रिम बाह्य नावीन्याची चटक लागलेली असते

म्हणून हा परिणाम ! फुलत्या अन्तःकरणाची नावीन्यपूर्ण टवटवी जर सतत राहिल तर पहिलेपणाचं नावीन्य सतत अनुभवता येईल.

म्हणूनच मला वाटतं की साऱ्या जीवनात, जीवनातील प्रत्येक क्षणात, पहिलेपणाचं नावीन्य आहे, पण त्याचा उपभोग घ्यायला तशीच भावपूर्ण विचारी अन्तःकरणं हवीत. सौन्दर्याचं नावीन्य आज नाही उद्या नष्ट होणारंच असतं. ते नष्ट झालं तरी मानवी हृदयाचं नावीन्य जोपर्यन्त कायम आहे तोपर्यन्त जीवन जगण्याच्या लायकीचं आहे असं समजावं. ते नावीन्य जर नाहीसं झालं तर......तर मी तरी त्याला जीवन म्हणावयासचं तयार नाही.

  

## २४ : : : : : : तरङ्ग

"काय नाव द्यावं बरं या सङ्ग्रहाला ?" मी म्हटलं.

"तरङ्ग!" शशी म्हणाला.

मला वाटलं 'तरङ्ग', खरंच किती गोड नाव आहे! होय, पण जगात काय वाईट आहे ? सुखाचे तसे दुःखाचे तरङ्गसुद्धा आयुष्याला माधुर्य आणतातच, नाही का ? कालाच्या पृष्ठभागावर सकाळ, दुपार, सन्ध्याकाळ, दिवस, रात्र, उन्हाळा, पावसाळा असे अनेक लहान-मोठे तरङ्ग येतात नि लयाला जातात! नभःसागरातील फेसाळत्या मेघ·

लाटावरील बिजलीचे तरङ्ग किती मनोहर असतात! प्रातःकाळी प्राचीच्या हसऱ्या मुखावर खेळणारे तरङ्ग काय कमी रमणीय असतात?

अनादिकालापासून पृथ्वीतलावर किती तरी स्थित्यन्तरं होत गेली! कालसागराच्या कित्येक लाटा येऊन गेल्या. जगाच्या किनाऱ्यावर त्या लाटानी अनेक महान् तेजस्वी रत्नं आणून फेकली. त्या अमूल्य रत्नाबरोबर असङ्ख्य शङ्खशिम्पले हि फेकले हे खरंच आहे!

खैबरखिण्डीतून आलेल्या महम्मदी तरङ्गांनी जौळाचं स्वरूप धारण करून भारताची अमोल सम्पत्ति धुऊन नेली. आरबी समुद्रात प्रवेश केलेल्या फिरङ्गी लाटानी हिन्दूंच्या स्वाभिमान, संस्कृति, स्वत्व इत्यादि गुणरत्नाना आपल्या विशाल उदरात गडप केलं. भारतवर्षाची सम्पत्ति परकीय सत्तासागरानं हरण केली ती परत आणण्याला शिवाजी, टिळक, गान्धी, जवाहरलाल इत्यादि अगस्ति निर्माण झाले!

तरङ्ग हे नेहमीच गोड असतात. मग ते कसलेहि असोत! विचारांचे असोत, विकारांचे असोत, भावनांचे असोत वा प्रेमाचे असोत, पण ते कुठपर्यन्त? त्यानी लाटाचं स्वरूप धारण केलं नाही तोपर्यन्तच! त्यानी लाटाचं स्वरूप धारण केलं की, तुफानाला काय वेळ? धर्म, राज्य, पैसा, सत्ता, महत्त्वाकाङ्क्षा ही तरङ्गासारखी नाहीत का? ती अति-

रेकाला पोहोचलं की मानवी जीविताचा त्यात चुराडा व्हायला काय वेळ लागणार ?

मानवी जीवित बुडबुड्यासारखं आहे म्हणतात; पण मला नाही ते पटत. मनुष्याचं जीवित हे सागरासारखं अफाट नि अथाङ्ग आहे. त्यात सद्भावनाची रत्नं लपलेली असतात. पाशवी नि आसुरी विकारांचे नक्र त्यात असतात. बाल्य, तारुण्य व वार्धक्य हे तरङ्ग त्यांच्यावर खेळत असतात. जीवनातील सर्वांत रम्य तरङ्ग म्हणजे बाल्य! त्यावेळीं सागर सारा दिवस नि रात्र किनाऱ्याशीं मृदुमधुर गुजगोष्टी बोलून हसत–खिदळत असतो आनन्दानं! कसलीहि चिन्ता नाही, सगळा आनन्दच! भरतीच्या वेळचे तरङ्ग म्हणजे तारुण्य! पराक्रमाच्या हिरिरीनं कितीहि क्षेत्र पादाक्रान्त केलं तरी अपुरं वाटणारी महत्त्वाकाङ्क्षी वृत्ति त्या वेळी असते मनाची! नि ओहटीचा काल म्हणजे वार्धक्य! संसाराचे पाश आखडते घेऊन अनन्ताच्या माण्डीवर सुखानं निजण्याची इच्छा करणारा तो वार्धक्याचा कालतरङ्ग! आयुष्य किती विविध रमणीय तरङ्गांनी नटलेलं आहे! नि मनुष्य त्याला बुडबुड्याची उपमा देतो!

काही तरङ्ग किती अपूर्व नि गोड असतात! वायूचे तरङ्ग कधी कुणी पाहिले आहेत का? मृगजळाचे तरङ्ग कधी कुणी स्पर्शिले आहेत का? पण त्यातसुद्धा किती माधुर्य

आहे! वायूच्या तरङ्गानीं मानवी मन किती उत्साहि होतं. मनःसागरात प्रीतीचे अज्ञात तरङ्ग असेच उद्भूत होतात. सर्व शरीर त्या तरङ्गानीं फुलकित होतं! स्वत्वाचं भान उरत नाही नि विश्व प्रेममय भासू लागतं !

वाङ्मय तरी काय? वेळोवेळी प्रतिभेच्या धक्यानं उत्पन्न होणारे विचारांचे-भावनांचे--तरङ्गच ना शद्बरूपानं जन्म घेतात? लेखकाच्या आन्तरिक खळबळीचं प्रतीकच ते!

तरङ्ग क्षणिक नाहीत. ते शाश्वत स्वरूपाचे असतात! पाठशिवणीचा खेळ खेळत, आनन्दानं हसत हसत, आपली जीवनशृङ्खला तयार करतात. एकामागून दुसरे हजर असतात! एकाचं कार्य दुसरा चालू ठेवतो. किनाऱ्यावरचे मोठमोठे खडकसुद्धा लहानशा तरङ्गाच्या कामगिरीनी विरून जातात! मनुष्यानंसुद्धा असंच नको का वागायला? उमलत्या उमेदींनं नि हसऱ्या मुखानं जगातील धकाधकीचा मामला सहन करीत, अनन्तात विलीन होणं हेच सुखावह आहे, नाही का?

